201101052027010001



# महाराष्ट्र शासन राजपत्र

## असाधारण भाग एक-अ— मध्य उप-विभाग

वर्ष २, अंक २(२)] गुरुवार, मार्च २५, २०१०/चैत्र ४, शके १९३२ [ पृष्ठे १२६, किंमत : रुपये २०.००

असाधारण क्रमांक ५२

**प्राधिकृत प्रकाशन**

**महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या, ग्रामपंचायती, नगरपरिषदा, प्राथमिक शिक्षण आणि स्थानिक निधी लेखापरीक्षा अधिनियम यांखालील (भाग चार-ब मध्ये प्रसिद्ध करण्यात आलेले आदेश व अधिसूचना यांव्यतिरिक्त) आदेश व अधिसूचना.**

**नगरविकास विभाग**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २५ मार्च २०१०

**अधिसूचना**

**मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९.**

क्रमांक स्थासंक. ०२०९/प्र.क्र.६५/०९/न.वि.-३४.— मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९ (१९४९ चा मुंबई ५९) याच्या कलम १५२-न च्या पोट-कलम (१) द्वारे प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा आणि त्या बाबतीत महाराष्ट्र शासनास समर्थ करणाऱ्या इतर सर्व अधिकारांचा वापर करून महाराष्ट्र शासन याद्वारे पुढील नियम, सदर नियमास १५२-न च्या पोट-कलम (२) अन्वये आवश्यक असल्याप्रमाणे पूर्व प्रसिद्धी देऊन करीत आहे, ते असे :—

१. **संक्षिप्त नाव.**— या नियमांना मुंबई प्रांतिक महानगरपालिका (स्थानिक संस्था कर) नियम,२०१० असे म्हणावे.

२. **व्याख्या.**— (१) या नियमांत, संदर्भानुसार दुसरा अर्थ अपेक्षित नसेल तर,—

(क) "अधिनियम" याचा अर्थ, मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ (१९४९ चा मुंबई ५९), असा आहे;

(ख) "नियत दिवस" याचा अर्थ, शासनाने राजपत्रात अधिसूचित केलेल्या ज्या दिवसापासून महानगरपालिकेला तिच्या क्षेत्रात जकातीऐवजी स्थानिक संस्था कर बसविण्यास प्रारंभ करण्याचे निदेश दिले आहेत, तो दिवस असा आहे;

(ग) "पदनिर्देशित बँक" याचा अर्थ, महानगरपालिकेने त्यांच्या वतीने स्थानिक संस्था कराची रक्कम स्वीकारण्यासाठी प्राधिकृत केलेली बँक, असा आहे ;

(घ) "नमुना" याचा अर्थ, नियमांना जोडलेला नमुना, असा आहे;

(ङ) "कलम" याचा अर्थ, अधिनियमाचे कलम, असा आहे ;

(च) महानगरपालिकेच्या संबंधात "अनुसूची क" याचा अर्थ, राज्य शासनाने या अधिनियमाच्या कलम ९९.ख अन्वये राजपत्रात अधिसूचित करण्यात आलेली अनुसूची असा आहे. ज्यामध्ये, या अधिनियमाच्या तरतुदींअन्वये अशा महानगरपालिका क्षेत्रातील मालांवर ज्या दराने स्थानिक संस्था कर बसवण्यायोग्य असेल तो माल व तो दर नमूद केला आहे :

(छ) महानगरपालिकेच्या संबंधात "अनुसूची-ख" याचा अर्थ, अधिनियमाच्या कलम १५२-अ च्या तरतुदीअन्वये राजपत्रात अधिसूचित करण्यात आलेली अनुसूची, असा आहे. ज्यामध्ये, या अधिनियमाच्या तरतुदीअन्वये अशा महानगरपालिका क्षेत्रातील ज्या मालांवर स्थानिक संस्था कर बसवण्यायोग्य नसेल अशा मालांचा समावेश केला आहे;

(ज) "अधिसूचित दिवस" याचा अर्थ महानगरपालिका, तिच्या क्षेत्रात यथास्थिती जकात किंवा उपकर ऐवजी स्थानिक संस्था कर बसविण्याचा निदेश देणारी अधिसूचना शासनाने राजपत्रात ज्या दिवशी प्रसिद्ध केली तो दिवस, असा आहे;

(२) या नियमांत वापरलेले परंतु व्याख्या न केलेले शब्द व शब्दप्रयोग यांना अधिनियमामध्ये अनुक्रमे जे अर्थ नेमून दिलेले असतील तेच अर्थ असतील.

३. नोंदणीकरिता उलाढालीच्या मर्यादा.—(१) नोंदणीकरिता उलाढालीच्या मर्यादा पुढीलप्रमाणे असतील :—

(क) व्यापारी, जो आयात करणारा असेल आणि ज्याची अनुसूची क मध्ये विनिर्दिष्ट केलेल्या मालाच्या खरेदीची किंवा विक्रीची उलाढाल, वर्षभरात, रुपये ५००० पेक्षा कमी नाही आणि त्या वर्षभरात त्याने आयात केलेल्या सर्व मालाचे मूल्य रुपये ५००० पेक्षा कमी नाही आणि त्या वर्षभरात त्याची विक्रीची उलाढाल किंवा खरेदीची उलाढाल ही रुपये १,००,००० पेक्षा कमी नाही.

(ख) अन्य कोणत्याही बाबतीत, खंड (क) अन्वये एखादा व्यापारी, स्थानिक संस्था कर भरण्यास पात्र झालेला नसेल अशा प्रकरणासह आणि अनुसूची क मध्ये विनिर्दिष्ट केलेल्या मालांच्या खरेदीची उलाढाल वर्षभरात रुपये ५००० पेक्षा कमी नाही आणि त्याच्या सर्व विक्रीची उलाढाल वर्षभरात रुपये १,५०,००० पेक्षा कमी नाही.

(२) उपनियम (१) मध्ये काहीही अंतर्भूत असले तरी शहराच्या हद्दीत एखादा विशिष्ट धंदा नियमितपणे न करणारा एखादा व्यापारी किंवा व्यक्ती शहराच्या हद्दीत तात्पुरत्या स्वरूपात एखादा धंदा करीत असेल तर या अधिनियमाखाली व नियमाखाली असा व्यापारी किंवा व्यक्ती उपनियम १ खाली तात्पुरत्या नोंदणीस पात्र राहील.

४. नोंदणीच्या दायित्वाकरिता उलाढालीच्या मर्यादांची परिगणना करणे.—(१) नोंदणीकरिता दायित्वासाठी उलाढालीच्या मर्यादांची परिगणना करण्याच्या प्रयोजनाकरिता,—

(क) अन्यथा तरतूद केलेली असेल त्या व्यतिरिक्त, सर्व विक्रीची उलाढाल किंवा सर्व खरेदीची उलाढाल हिशेबात घेण्यात येईल- मग अशी मालाची विक्री किंवा खरेदी ही या अधिनियमाच्या आणि नियमांच्या तरतुदींअन्वये करयोग्य असो किंवा नसो;

(ख) उलाढालीमध्ये व्यापाऱ्याने स्वतःच्या वतीने आणि त्याच्या लेख्यांमध्ये नमूद केलेल्या प्रमुखांच्या वतीने केलेल्या सर्व विक्रीचा किंवा खरेदीचा देखील अंतर्भाव असेल.

(ग) लिलाव करण्याच्या बाबतीत, उलाढालीशिवाय, खंड (क) व (ख) मध्ये निर्दिष्ट केलेल्या कोणतीही असल्यास, उलाढालीमध्ये त्यांच्या प्रमुखासाठी त्याने लिलाव केलेल्या मालाच्या किंमतीचा जर अशा मालाची किंमत त्यांनी त्याच्या प्रमुखाच्या वतीने स्वीकारलेली असेल तर अंतर्भाव होईल, मग उद्देशित खरेदीचा देकार त्याने किंवा त्या प्रमुखाने किंवा त्या प्रमुखाच्या नामनिर्देशित व्यक्तीने स्वीकारलेला असो.

(२) एखाद्या अनिवासी व्यापाऱ्याच्या शहरी क्षेत्रात राहणारा एखादा व्यवस्थापक किंवा एजंट या नियमान्वये नोंदणीसाठी पात्र असेल मग तो किंवा यथास्थिती, तो अनिवासी व्यापारी असो किंवा नसो, या नियमान्वये नोंदणीकरिता पात्र असेल आणि एखादा कमिशन एजंट किंवा कोणत्याही नावाने ओळखण्यात येणारा अन्य कोणताही एजंट तसेच लिलाव करणारा, या नियमान्वये नोंदणीकरिता पात्र असेल मग तो व्यापारी प्रमुख असो किंवा नसो आणि या नियमान्वये नोंदणीकरिता असा प्रमुख पात्र असो किंवा नसो.

५. विवक्षित प्रकरणांमध्ये स्थानिक संस्था कर भरण्याचे दायित्व असणाऱ्यांच्या बाबतीत विशेष तरतूद.—(१) अधिनियमाच्या प्रकरण अकरा-ख अन्वये स्थानिक संस्था कर भरण्यास पात्र असलेला एखादा व्यापारी मरण पावला तर, —

(क) त्या व्यापाऱ्याने चालू केलेला धंदा त्याच्या मृत्युनंतर त्याच्या कायदेशीर प्रतिनिधीने किंवा इतर कोणत्याही व्यक्तीने चालू ठेवला असेल तर असा कायदेशीर प्रतिनिधी किंवा इतर कोणतीही व्यक्ती, मयत व्यापाऱ्यास जर तो मरण पावला नसता तर, ज्या रीतीने आणि ज्या मर्यादेपर्यंत स्थानिक संस्था कर भरावा लागला असता त्याच रीतीने आणि त्याच मर्यादेपर्यंत, या नियमान्वये, अशा व्यापाऱ्याकडून देय असलेली कोणतीही शास्ती व व्याज यासह स्थानिक संस्था कर भरण्यास पात्र असेल, आणि

(ख) त्या व्यापाऱ्याने चालू केलेला धंदा त्याच्या मृत्युपूर्वी किंवा मृत्युनंतर बंद पडला असेल तर त्याचा कायदेशीर प्रतिनिधी, तो मयत व्यापारी मरण पावला नसता तर, ज्या रीतीने व ज्या मर्यादेपर्यन्त, स्थानिक संस्था कर भरण्यास पात्र झाला असता त्याच रीतीने व त्याच मर्यादेपर्यंत, मयताच्या मालमत्तेमधून या नियमान्वये अशा व्यापाऱ्याकडून देय असलेली कोणतीही शास्ती, व्याज व जप्त केलेली रक्कम यासह स्थानिक संस्था कर भरण्यास पात्र असेल- मग अशी शास्ती व व्याज यासह स्थानिक संस्था कराचे निर्धारण किंवा परिमाण त्याच्या मृत्युपूर्वी करण्यात आलेले असो किंवा नसो- परंतु त्याच्या मृत्युनंतर रक्कम भरावयाची किंवा निर्धारण करावयाची किंवा परिमाण करावयाची राहून गेली असली तरी.

(२) या नियमान्वये, स्थानिक संस्था कर भरण्यास पात्र असलेली व्यक्ती मरण पावल्यास, तिचा कायदेशीर प्रतिनिधी, त्या मयत व्यापाऱ्याचा मृत्यु झाला नसता तर ज्या रीतीने व ज्या मर्यादेपर्यन्त स्थानिक संस्था कर भरण्यास तो जबाबदार राहिला असता त्याच रीतीने व त्याच मर्यादेपर्यन्त मयताच्या मालमत्तेमधून या नियमान्वये अशा व्यापाऱ्याकडून देय असलेली कोणतीही शास्ती आणि व्याज यासह स्थानिक संस्था कराचे निर्धारण किंवा परिमाण त्याच्या मृत्युपूर्वी करण्यात आले असेल परंतु त्याच्या मृत्युनंतर भरावयाची किंवा निर्धारण करावयाची अथवा परिमाण करावयाची राहून गेली असली तरी.

(३) या नियमान्वये स्थानिक संस्था कर भरण्यास पात्र असलेला एखादा व्यापारी हा हिंदू अविभक्त कुटुंब असेल आणि संयुक्त कुटुंबाची मालमत्ता ही कुटुंबातील विविध व्यक्तींमध्ये किंवा व्यक्तींच्या गटामध्ये विभागली गेली असेल त्याबाबतीत, प्रत्येक व्यक्ती किंवा व्यक्तींचा गट, असे विभाजन होण्याच्या वेळेपर्यंत त्या व्यापाऱ्याकडून या नियमाअन्वये देय असलेला स्थानिक संस्था कर व कोणतेही व्याज, शास्ती आणि जप्त केलेली रक्कम एकत्रितपणे व स्वतंत्रपणे देण्यास पात्र असेल- मग असा स्थानिक संस्था कर तसेच शास्ती किंवा व्याज यांची आकारणी किंवा परिमाण विभाजनानंतर आकारण्यात किंवा ठरविण्यात येऊन ते भरावयाचे किंवा निर्धारण करावयाचे अथवा परिमाण करावयाचे राहून गेले असले तरी.

(४) या नियमान्वये स्थानिक संस्था कर भरण्यास पात्र असणारा व्यापारी, ही एक भागीदारी संस्था असेल व ती भागीदारी संस्था विसर्जित झाली असेल त्या बाबतीत, त्या भागीदारी संस्थेचा भागीदार असणारी प्रत्येक व्यक्ती, विसर्जनाच्या वेळेपर्यंत त्या भागीदारी संस्थेकडून नियम ६ अन्वये देय असलेला स्थानिक संस्था कर व कोणतेही व्याज, शास्ती देण्यास तो पात्र असेल त्यासह स्थानिक संस्था कर एकत्रितपणे किंवा स्वतंत्रपणे देण्यास पात्र असेल- मग असा स्थानिक संस्था कर व कोणतेही व्याज किंवा शास्ती अशा विसर्जनापूर्वी निर्धारण करण्यात किंवा परिमाण करण्यात येऊन अशा विसर्जनानंतर भरावयाचे किंवा परिमाण ठरवावयाचे राहून गेले असले तरी.

(५) या नियमान्वये, स्थानिक संस्था कर भरण्यास पात्र असणारा व्यापारी, विक्री, भाडेपट्टा, संमती-नि-परवानगी याद्वारे, भाड्याने किंवा अन्य कोणत्याही प्रकारे आपला धंदा पूर्णपणे किंवा अंशतः हस्तांतरित केला असेल किंवा त्याची विल्हेवाट लावली असेल अथवा त्याच्या मालकीत कोणताही बदल केला असेल, त्या परिणामी अन्य कोणतीही व्यक्ती त्याच्या धंद्याची किंवा धंद्याच्या भागाची उत्तराधिकारी झाली आहे त्याबाबतीत, तो व्यापारी व व्यक्ती जिच्याकडे धंदा हस्तांतरित केला आहे किंवा यथास्थिती, जिच्याकडे धंदा हस्तांतरित केला आहे अशी उत्तराधिकारी, या नियमान्वये व्यापाऱ्याकडून देय असलेले कोणतेही व्याज, शास्ती व जप्त केलेली रक्कम यासह, असे हस्तांतरण, विल्हेवाट किंवा बदल होण्याच्या वेळेपर्यंत, स्थानिक संस्था कर भरण्यास संयुक्तपणे व पृथकपणे पात्र असतील- मग असे हस्तांतरण, विल्हेवाट किंवा बदल होण्यापूर्वी कोणतीही शास्ती व व्याज यासह अशा स्थानिक संस्था कराचे निर्धारण केलेले असो किंवा नसो किंवा परिमाण ठरविलेले असो किंवा नसो परंतु त्यानंतर भरावयाचे किंवा निर्धारण करावयाचे अथवा परिमाण ठरवावयाचे राहून गेलेले असो वा नसो.

(६) या नियमान्वये स्थानिक संस्था कर भरण्यास पात्र असलेला व्यापारी किंवा, यथास्थिती, पात्र असलेले व्यापारी, जर,—

(क) एखाद्या पाल्याचा पालक असेल व त्या पाल्याच्या वतीने धंदा चालवित असेल, किंवा

(ख) हे विश्वस्त असतील व लाभाधिकाऱ्यासाठी विश्वस्त व्यवस्थेनुसार धंदा चालवित असतील त्याबाबतीत पालकत्व किंवा विश्वस्तव्यवस्था यांची मुदत समाप्त झाल्यास, पाल्य किंवा यथास्थिती लाभाधिकारी असे पालकत्व किंवा विश्वस्तव्यवस्था समाप्त होण्याच्या वेळेपर्यंत, त्या व्यापाऱ्याकडून देय असलेला स्थानिक संस्था कर व कोणतेही व्याज, शास्ती किंवा जप्त केलेली रक्कम देण्यास पात्र असेल- मग असा स्थानिक संस्था कर व कोणतीही शास्ती किंवा व्याज, असे पालकत्व किंवा विश्वस्तव्यवस्था समाप्त होण्यापूर्वी आकारण्यात किंवा ठरविण्यात आले असताना ते अदत्त राहिलेले असो किंवा ते त्यानंतर आकारण्यात किंवा ठरविण्यात आलेले असो.

(७) या नियमाअन्वये स्थानिक संस्था कर भरण्यास पात्र असणाऱ्या व्यापाऱ्याची पोट-नियम (१) चा खंड (क) किंवा पोट-नियम (५) मध्ये वर्णन केलेल्या रीतीने कोणतीही व्यक्ती, धंद्यामध्ये उत्तराधिकारी होईल त्याबाबतीत, नियम ३ व ४ मध्ये काहीही अंतर्भूत असले तरीही, अशी व्यक्ती अशा उत्तराधिकाराच्या किंवा हस्तांतरणाच्या दिनांकाला व त्यानंतर स्थानिक संस्था कर भरण्यास पात्र असेल आणि त्याच्याकडे आधीपासूनच नोंदणी प्रमाणपत्र असेल त्याखेरीज अशा उत्तराधिकाराच्या किंवा हस्तांतरणाच्या दिनांकापासून तीस दिवसांच्या आत, अशा प्रमाणपत्रासाठी अर्ज करील.

६. **भागीदारी संस्थेची दायित्वे.**—याविरुद्ध कोणताही करार असला तरी या नियमान्वये स्थानिक संस्था कर भरण्यास कोणतीही भागीदारी संस्था जबाबदार असेल त्याबाबतीत ती भागीदारी संस्था आणि त्या भागीदारी संस्थेचा प्रत्येक भागीदार असा स्थानिक संस्था कर भरण्यास संयुक्तपणे आणि पृथकपणे जबाबदार असेल :

परंतु, असा कोणताही भागीदार त्या भागीदारी संस्थेमधून निवृत्त झाला असेल त्याबाबतीत तो त्याच्या निवृत्तीची तारीख त्या तारखेपासून साठ दिवसांच्या आत आयुक्तास त्याबाबतीत लेखी नोटीसीद्वारे कळवील आणि तो त्याच्या निवृत्तीच्या वेळी भरावयाचा राहिलेला असल्यास कोणताही स्थानिक संस्था कर आणि शास्ती, व्याज व जप्त केलेली रक्कम भरण्यास आणि निर्धारण किंवा त्याचे परिमाण त्याच्या स्थानिक संस्था कर किंवा देय किंवा वसुलीयोग्य असलेले व्याज किंवा शास्ती भरण्यास सुद्धा तो जबाबदार असेल :

परंतु, आणखी असे की, निवृत्तीच्या तारखेपासून साठ दिवसांच्या आत अशी कोणतीही सूचना देण्यात आलेली नसेल तर तो निवृत्त होणारा भागीदार आयुक्तास अशी सूचना मिळाल्याच्या दिवसापासून तो निवृत्त होणारा भागीदार अशा दिवसापर्यंत निवृत्त झाला नसल्याप्रमाणे, निवृत्तीच्या तारखेनंतरच्या कालावधीच्या संबंधात स्थानिक संस्था कर व्याज, शास्ती किंवा जप्त केलेली रक्कम भरण्यास संयुक्तपणे आणि पृथकपणे जबाबदार असल्याचे चालू राहील.

७. **प्रमुखांच्या वतीने स्थानिक संस्था कर देण्यास जबाबदार असलेले कमिशन एजंट.**—(१) एखाद्या कमिशन एजंटाने किंवा कोणत्याही नावाने ओळखण्यात येणाऱ्या इतर कोणत्याही एजंटाने किंवा लिलाव करणाऱ्याने त्याच्या प्रमुखाच्या वतीने उपभोगासाठी, उपयोगासाठी किंवा तेथे विक्री करण्यासाठी शहराच्या हद्दीमध्ये कोणतीही वस्तू आयात केल्या असतील त्याबाबतीत, असा कमिशन एजंट, इतर एजंट किंवा यथास्थिती, लिलाव करणारा आणि तो प्रमुख हे दोघेही संयुक्तपणे आणि पृथकपणे अशा वस्तूंवरील स्थानिक संस्था कर भरण्यास जबाबदार असेल.

(२) ज्याच्या वतीने कमिशन एजंटाने, इतर कोणत्याही एजंटाने किंवा लिलाव करणाऱ्याने उपभोगासाठी, उपयोगासाठी किंवा तेथे विक्री करण्यासाठी शहराच्या हद्दीमध्ये कोणताही माल आयात केलेला आहे, अशा प्रमुखाने आयुक्ताची अशी खात्री पटवून दिली असेल की, पोट-नियम (१) अन्वये अशा वस्तूंवरील स्थानिक संस्था कर त्याच्या कमिशन एजंटाने, इतर एजंटाने किंवा लिलाव करणाऱ्याने भरलेला असेल तर त्याच वस्तूंच्या संबंधात पुन्हा स्थानिक संस्था कर भरण्यास तो प्रमुख जबाबदार असणार नाही.

(३) एखाद्या अनिवासी व्यापाऱ्याच्या व्यवस्थापकाने किंवा एजंटाने कोणत्याही वस्तू उपभोगासाठी, उपयोगासाठी किंवा तेथे विक्री करण्यासाठी शहराच्या हद्दीमध्ये आयात केलेल्या असतील त्या बाबतीत तो अनिवासी व्यापारी आणि त्या शहरात राहणारा व्यवस्थापक किंवा एजंट अशा वस्तूंवरील स्थानिक संस्था कर भरण्यास संयुक्तपणे आणि विभक्तपणे जबाबदार असेल.

(४) अनिवासी व्यापाऱ्याने, आयुक्तास असे दाखवून दिले की, त्या त्या शहरात राहणाऱ्या व्यवस्थापकाने किंवा एजंटाने स्थानिक संस्था कर भरलेला आहे तर तो अनिवासी व्यापारी, त्याच वस्तुंच्या संबंधात पुन्हा स्थानिक संस्था कर भरण्यास जबाबदार नसेल.

८. **नियम ५ अन्वये स्थानिक संस्था कर भरण्यास पात्र असलेल्या व्यक्तींना या नियमांच्या तरतुदी लागू करणे.**—या नियमान्वये, व्यापाऱ्याकडून किंवा व्यक्तीकडून थकीत असलेले कोणतेही शास्ती किंवा व्याज किंवा दोन्हींसह कोणत्याही स्थानिक संस्था कराच्या संबंधात नियम ५ अन्वये तो रक्कम भरण्यास इतर कोणतीही व्यक्ती जबाबदार असेल त्याबाबतीत, या नियमाच्या सर्व संबंधित तरतुदी, अशा दायित्वाच्या संबंधात अशा व्यक्तीस, जणूकाही ती व्यक्ती, तो व्यापारी किंवा तिने स्वतः नमूद केलेली पहिली व्यक्ती असल्याप्रमाणे, लागू होतील.

९. **नोंदणी.**—(१) स्थानिक संस्था कर नियमांच्या नियम ३ अन्वये किंवा नियम ५ च्या पोट नियम (७) अन्वये नोंदणी केली जाण्यास पात्र असलेला कोणताही व्यापारी, त्याच्याकडे या नियमाद्वारे तरतूद केल्याप्रमाणे वैध नोंदणी प्रमाणपत्र असल्याखेरीज व्यापारी म्हणून धंदा करणार नाही :

परंतु, अशा नोंदणीकरिता त्या व्यापाऱ्याने विहित रीतीने व वेळात किंवा, यथास्थिती, विहित कालावधीत अर्ज केला असेल आणि नोंदणी होईपर्यंत त्याने असा धंदा चालू ठेवल्यास त्यामुळे या पोट नियमाच्या तरतुदींचा भंग झाल्याचे मानले जाणार नाही.

(२) पोट नियम (१) द्वारे ज्याने नोंदणी प्रमाणपत्र बाळगणे आवश्यक आहे असा प्रत्येक व्यापारी,—

(क) (एक) अधिसूचित दिनांक येत असेल त्याच्या लगतपूर्वीच्या वर्षी, किंवा

(दोन) दिनांक १ एप्रिलला सुरू होणाऱ्या आणि नंतरच्या वर्षी अधिसूचित दिनांकाच्या लगतपूर्वीच्या दिनांकास संपणाऱ्या कालावधीत,

त्याच्या सर्व विक्रीची उलाढाल किंवा सर्व खरेदीची उलाढाल, नियम ३ मध्ये विनिर्दिष्ट केलेल्या मर्यादेपेक्षा अधिक झाली असेल त्याबाबतीत, नियत दिनांकास किंवा त्याच्या लगतपूर्वीच्या दिनांकास किंवा अधिसूचित दिनांक, यापैकी जो नंतरचा असेल, त्या दिनांकास किंवा त्यापूर्वी तीस दिवसांच्या कालावधीत, नोंदणीसाठी अर्ज करील,

(ख) अधिसूचित दिनांकास सुरु होणाऱ्या आणि नियत दिनांकास संपणाऱ्या कालावधीत त्याच्या सर्व विक्रीची किंवा सर्व खरेदीची उलाढाल प्रथम ज्या दिवशी, नियम ३ मध्ये विनिर्दिष्ट केलेल्या संबंधित मर्यादेपेक्षा अधिक झाली असेल त्याबाबतीत, त्या दिनांकापासून तीस दिवसांच्या आत किंवा नियत दिनांकास किंवा त्याच्या लगतपूर्वीच्या दिनांकास, यापैकी जो नंतरचा असेल त्या दिनांकास, नोंदणीसाठी अर्ज करील,

(ग) नियम ३ च्या उप नियम (२) खाली पात्र असल्यास, तात्पुरत्या स्वरूपात धंदा सुरू करण्याच्या दिनांकापूर्वी १५ दिवसांत अर्ज करेल.

(घ) इतर कोणत्याही प्रकरणी, दिनांक १ एप्रिलला सुरू होणाऱ्या वर्षात त्याच्या सर्व विक्रीची उलाढाल किंवा सर्व खरेदीची उलाढाल प्रथम ज्या दिवशी नियम ३ मध्ये विनिर्दिष्ट केलेल्या संबंधित मर्यादेपेक्षा अधिक होईल त्याबाबतीत त्या दिवसापासून तीस दिवसांच्या आत अर्ज करील.

(३) महाराष्ट्र मूल्यवर्धित कर अधिनियम,२००२ च्या तरतुदींअन्वये, नियत दिनांकास नोंदणी कृत असलेला प्रत्येक व्यापारी, अशा दिनांकापासून, या नियमांन्वये नोंदणीकृत व्यापारी असल्याचे मानण्यात येईल.

(४) नोंदणीसाठी करावयाचा अर्ज शंभर रुपये नोंदणी शुल्कासह, नमुना “ क ” मध्ये आयुक्ताकडे करण्यात येईल.

(५) नोंदणीसाठी करण्यात येणारा प्रत्येक अर्ज,—

(क) एखाद्या व्यक्तीकडून धंदा चालविण्यात येत असेल त्या बाबतीत मालकाकडून किंवा अशा मालकाच्या वतीने काम करण्यास योग्य प्राधिकार असणाऱ्या व्यक्तीकडून,

(ख) भागीदारी संस्थेकडून धंदा चालविण्यात येत असेल त्याबाबतीत तिच्या भागीदाराकडून,

(ग) अविभक्त हिंदू कुटुंबाकडून धंदा चालविण्यात येत असेल त्या बाबतीत कुटुंबातील कर्त्या व्यक्तीकडून किंवा कुटुंबातील प्रौढ व्यक्तीकडून,

(घ) कंपनी, सहकारी संस्था किंवा महामंडळ किंवा स्थानिक प्राधिकरण यांच्यासह एखाद्या निगम निकायाकडून धंदा चालविण्यात येत असेल त्याबाबतीत त्या निगम निकायाचा संचालक, व्यवस्थापक, सचिव किंवा प्रमुख अधिकारी यांच्याकडून किंवा त्याच्या वतीने काम करण्यासाठी यथोचितरित्या प्राधिकृत करण्यात आलेल्या व्यक्तीकडून करण्यात येईल.

(६) भागीदारी संस्थेच्या बाबतीत, तिचा प्रत्येक भागीदार, नमुना क मध्ये तरतूद केल्याप्रमाणे प्रतिज्ञापत्र सादर करील. नोंदणीसाठी करण्यात येणाऱ्या अर्जासोबत असे प्रतिज्ञापत्र सादर न करण्यात आल्यास, नमुना ' क ' मध्ये असा अर्ज करण्यात आल्याच्या दिनांकापासून तीन महिन्यांपेक्षा उशिरा नसेल एवढ्या अवधीत तो सादर करण्यात येईल.

(७) पोट नियम (५) च्या खंड (क), (ख) किंवा (ग) मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या नात्याने नोंदणीसाठी करण्यात आलेल्या अर्जावर सही करणारी व तो सत्यापित करणारी प्रत्येक व्यक्ती, त्या अर्जासोबत अलीकडे काढलेल्या स्वतःच्या छायाचित्राच्या पासपोर्ट आकारातील दोन प्रतिमुद्रा सादर करील.

(८) अशाप्रकारे छायाचित्र सादर करणारी व्यक्ती, आयुक्तासमोर हजर राहण्यास फर्मावले असल्यास, तसे करील व आपण सादर केलेल्या छायाचित्राच्या प्रतींवर आयुक्तासमक्ष सही करील.

(९) व्यक्तीकडून, भागीदारी संस्थेकडून, हिंदू अविभक्त कुटुंबाकडून किंवा विधिसंस्थापित नसलेल्या अन्य व्यक्तीसंघाकडून धंदा चालविण्यात येत असेल त्या बाबतीत, नोंदणीसाठी केलेल्या अर्जामध्ये, अशा व्यक्तींची, भागीदारी संस्थेच्या प्रत्येक भागीदारांची, कुटुंबातील प्रत्येक व्यक्तीची, किंवा यथास्थिती, संघाच्या व्यवस्थापन समितीच्या सदस्यांची व त्या धंद्यामध्ये कोणताही हितसंबंध असणाऱ्या व्यक्तींची नावे व स्थायी पत्ते नमूद करण्यात येतील.

(१०) नोंदणीसाठी करण्यात आलेल्या प्रत्येक अर्जामध्ये, अर्जदार ज्या मालाचा व्यापार करतो त्या मालाचे सर्वसाधारण वर्णन करील.

(११) आयुक्तांची, त्याला योग्य वाटेल अशी चौकशी केल्यानंतर नव्या नोंदणीसाठी करण्यात आलेला अर्ज व्यवस्थित असल्याबद्दल खात्री पटली तर तो अर्जदाराची नाव नोंदणी करील व त्यास, या नियमान्वये, या प्रयोजनासाठी विहित करण्यात आलेल्या नमुन्यातील प्रमाणपत्र देईल.

(१२) आयुक्तास, या नियमाच्या कोणत्याही तरतुदीन्वये सादर करण्यात आलेली किंवा अन्यथा मिळालेली कोणतीही माहिती विचारात घेतल्यानंतर, नोंदणी प्रमाणपत्रामध्ये वेळोवेळी सुधारणा करता येईल.

१०. **नोंदणी प्रमाणपत्र देणे.**—(१) नोंदणी प्रमाणपत्र नमुना ख मध्ये देण्यात येईल.

(२) नोंदणीसाठी अर्ज करणारा व्यापारी ही भागीदारी संस्था, हिंदू अविभक्त कुटुंब, निगम निकाय किंवा व्यक्तींचा संघ किंवा शासन असेल त्याबाबतीत अशी भागीदारी संस्था, कुटुंब, निगम निकाय, संघ किंवा यथास्थिती शासन यांच्या नावे नोंदणी प्रमाणपत्र देण्यात येईल.

(३) व्यापाऱ्याने नोंदणी प्रमाणपत्रासाठी अर्ज केल्यावर त्यास असे, नोंदणी प्रमाणपत्र देण्यात येईल, त्याबाबतीत,—

(क) तो अर्ज नियम ९, पोट-नियम (२) याच्या खंड (क) किंवा खंड (ख) चे उप खंड (एक) किंवा (दोन) मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या मुदतीत करण्यात आला असला तर ते नोंदणी प्रमाणपत्र, नियत दिवसांपासून अंमलात येईल.

(ख) या नियमांच्या, नियम ९ च्या पोट-नियम (२) च्या खंड (ग) मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या मुदतीत तो अर्ज करण्यात आला असेल तर, व्यापाऱ्यांची उलाढाल ज्यावेळी प्रथम या नियमांच्या नियम ३ मध्ये विनिर्दिष्ट केलेल्या संबंधित मर्यादेपेक्षा अधिक झाली असेल तर त्यावेळेपासून नोंदणी प्रमाणपत्र अंमलात येईल.

(ग) असा अर्ज, या नियमाच्या नियम ५ च्या पोट-नियम (७) मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या मुदतीत करण्यात आला असेल तर उक्त पोट-नियमा अन्वये व्यापारी ज्या दिनांकाला स्थानिक संस्था कर देण्यास पात्र होईल त्या दिनांकाला तो अंमलात येईल, आणि

(घ) असा अर्ज नियम ९ च्या उप-नियम (२) खंड (क) खाली किंवा अशा कालावधीच्या समाप्तीनंतर केला असल्यास अर्जाच्या दिनांकापासून कार्यान्वित होईल.

(ङ) एखादा व्यापारी किंवा व्यक्तीने नियम ९ उप-नियम (२) च्या खंड (ग) प्रमाणे नोंदणीसाठी केलेल्या अर्जान्वये नोंदणी प्रमाणपत्र दिले असल्यास ते आयुक्त यासबंधी विहित करील अशा दिनांकपर्यंत कार्यान्वित राहील.

परंतु असे की, नियम ३ च्या उप-नियम २ अन्वये नोंदणीस पात्र असलेल्या व्यक्तीला किंवा व्यापाऱ्याला आयुक्त ठरवील अशा रकमेची सुरक्षा ठेव त्याने यासाठी ठरवून दिलेल्या दिनांकापर्यंत ठेवण्यास आयुक्त भाग पाडू शकेल. या नियमाखाली सुरक्षा ठेवीची रक्कम असा व्यापारी किंवा व्यक्तीकडून देय असलेला स्थानिक संस्था कर, व्याज, किंवा यथास्थिती, दंडाच्या रकमेशी समायोजित केला जाईल.

(४) जेव्हा एखाद्या व्यापाऱ्याला या नियमाच्या नियम ९ च्या पोट-नियम (३) अन्वये नोंदणीकृत व्यापारी असल्याचे मानण्यात येईल त्यावेळी आयुक्त, त्याला या नियमाअंतर्गत नोंदणीकरिता त्याने अर्ज केलेला नसला तरी नोंदणी प्रमाणपत्र देईल आणि ते नियत दिवसापासून अंमलात येईल.

(५) एका शहरात, व्यापाऱ्याच्या धंद्याची ठिकाणे दोन किंवा त्याहून अधिक असतील त्याबाबतीत, आयुक्त, नोंदणीसाठी करण्यात आलेल्या अर्जामध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या (फक्त वखार नसेल) अशा धंद्याच्या प्रत्येक अतिरिक्त ठिकाणासाठी व्यापाऱ्याला प्रमाणपत्राची एक प्रत देईल.

११. **नोंदणी प्रमाणपत्राच्या जादा प्रती.**—(१) एखादा नोंदणीकृत व्यापारी त्याच्या त्यावेळी अस्तित्वात असलेल्या जागेच्या जागेखेरीज किंवा जागांखेरीज नवीन जागी धंदा सुरू करील अशा बाबतीत, व्यापाऱ्याने तसा अर्ज केला तर, आयुक्त नोंदणी प्रमाणपत्राच्या जादा प्रती देईल. पुरविण्यात आलेल्या प्रत्येक जादा प्रतीसाठी पंचवीस रुपये फी आकारण्यात येईल.

(२) नोंदणीकृत व्यापाऱ्याला देण्यात आलेले परंतु त्याच्याकडून हरवलेले, नष्ट झालेले किंवा विरूपित झालेले नोंदणी प्रमाणपत्र किंवा त्याच्या प्रती यांच्या बाबतीत त्या नोंदणीकृत व्यापाऱ्याने अर्ज केला तर त्याला आयुक्ताकडून त्याची दुसरी प्रत मिळविता येईल.

(३) नोंदणी प्रमाणपत्राच्या दुसऱ्या प्रतीसाठी किंवा जादा प्रतीसाठी अर्ज केला असेल त्याबरोबर प्रत्येक प्रतीसाठी पंचवीस रुपये फी देय असेल.

१२. **नोंदणी प्रमाणपत्र अहस्तांतरणीय असणे.**—नियम १४ मध्ये तरतूद करण्यात आली असेल त्याखेरीज करून व्यापाऱ्याला देण्यात येणारे नोंदणी प्रमाणपत्र हे वैयक्तीक असेल व ते हस्तांतरणीय असणार नाही.

१३. **नोंदणी प्रमाणपत्र प्रदर्शित करणे.**—प्रत्येक नोंदणीकृत व्यापारी आपल्या धंद्याच्या प्रत्येक ठिकाणी (फक्त वखार नसेल) अशा ठळक जागी नोंदणी प्रमाणपत्र किंवा त्याची प्रत लावील.

१४. **धंद्यामधील बदलाच्या संबंधात पुरवावयाची माहिती.**—(१) या नियमान्वये स्थानिक संस्था कर देण्यास जबाबदार असणारा कोणताही व्यापारी,—

(क) आपला धंदा विक्रीद्वारे, भाडेपट्ट्याद्वारे, संमती-नि-परवानगीद्वारे, भाड्याने किंवा इतर कोणत्याही रितीने पूर्णपणे किंवा अंशत: हस्तांतरित करील किंवा अन्यप्रकारे आपला धंदा किंवा त्याचा कोणताही भाग निकालात काढील किंवा धंद्याच्या मालकीमध्ये कोणताही बदल घडवून आणील किंवा त्याबद्दल त्याला काही माहित असेल, किंवा

(ख) आपला धंदा बंद करील किंवा त्याची जागा बदलील किंवा धंद्याची नवीन जागा सुरू करील, किंवा

(ग) आपल्या धंद्याचे नाव किंवा स्वरूप बदलील, किंवा

(घ) उपभोगासाठी, उपयोगासाठी किंवा विक्रीसाठी शहराच्या हद्दीमध्ये आणण्यात आलेल्या, मालाच्या वर्गात बदल करून आणील, किंवा

(ङ) आपल्या धंद्याच्या संबंधातील कोणत्याही भागीदारीमध्ये किंवा अन्य संघटनेमध्ये सहभागी होईल, अशा वर नमूद करण्यात आलेल्या घटनांपैकी कोणतीही घटना घडल्याच्या तारखेपासून साठ दिवसांच्या आत तदनुसार आयुक्ताना माहिती देईल:

आणि असा कोणताही व्यापारी मरण पावला असेल अशा बाबतीत त्याचा मृत्युपत्र व्यवस्थापक, प्रशासक किंवा अन्य कोणताही प्रतिनिधी किंवा असा कोणताही व्यापारी ही भागीदारी संस्था असेल आणि अशा भागीदारी संस्थेच्या रचनेत बदल झाला असेल किंवा ती भागीदारी संस्था विसर्जित झाली असेल अशा बाबतीत तिचा भागीदार असलेली प्रत्येक व्यक्ती असा मृत्युपत्रातील बदल किंवा यथास्थिति विसर्जन यासंबंधी अशाचरितीने आयुक्ताला कळवील.

(२) पोट नियम (१) अन्वये कोणतीही माहिती देताना व्यापाऱ्याने धारण केलेले नोंदणी प्रमाणपत्र व त्याच्या सर्व प्रती आयुक्ताकडे देण्यात येतील.

(३) नोंदणी प्रमाणपत्र देण्यात आल्यानंतर आणि त्याने त्याच्या प्रती आयुक्ताकडून घेतल्या असल्यास अशा प्रती मिळाल्यानंतर प्रस्तुत नमुन्यातील सुधारणेद्वारे किंवा नवीन नमुना त्यासाठी दाखल करून त्यामध्ये कोणताही बदल करण्यात आला असेल अशाबाबतीत, अशा बदलापासून साठ दिवसांच्या आत व्यापाऱ्याने नोंदणी प्रमाणपत्र आणि त्याच्या सर्व प्रती आयुक्ताकडे पाठविल्या पाहिजेत.

(४) अशाप्रकारे पाठविण्यात आलेले नोंदणी प्रमाणपत्र रद्द करण्यात आले नसेल अशाबाबतीत माहिती किंवा प्रस्तुत नमुन्यातील बदल लक्षात घेऊन करणे आवश्यक असतील अशा सुधारणा त्यामध्ये करून आयुक्त नवे नोंदणी प्रमाणपत्र देतील किंवा नव्याने नोंदणी करतील.

१५. **नोंदणी प्रमाणपत्र सादर करणे.**—या नियमान्वये नोंदणी प्रमाणपत्रात सुधारणा करण्याच्या प्रयोजनासाठी आयुक्त नोंदणीकृत व्यापाऱ्याला लेखी नोटिशीद्वारे नोंदणी प्रमाणपत्र सादर करण्यास फर्मावू शकेल.

१६. **विवक्षित परिस्थितीमध्ये नोंदणीप्रमाणपत्र चालू राहणे.**—एखाद्या नोंदणीकृत व्यापाऱ्याने,—

(क) आपल्या धंद्याच्या नावामध्ये बदल घडवून आणला असेल किंवा,

(ख) ती भागीदारी संस्था असेल आणि संस्थेचे विसर्जन न करता तिच्या रचनेत बदल करण्यात आला असेल, किंवा

(ग) तो विश्वस्त व्यवस्थेचा विश्वस्त असेल आणि तिच्या विश्वस्तामध्ये बदल झाला असेल, किंवा

(घ) तो पाल्याचा पालक असेल आणि पालकात बदल झाला असेल

अशा बाबतीत केवळ उपरोक्त पैकी कोणत्याही परिस्थितीमुळे त्या व्यापाऱ्याने किंवा रचना बदललेल्या भागीदारी संस्थेने किंवा नव्या विश्वस्ताने किंवा नव्या पालकाने, नव्या नोंदणी प्रमाणपत्रासाठी नव्याने नोंदणीची सर्व प्रक्रिया करण्याची आवश्यकता असणार नाही आणि नियम १४ अन्वये आवश्यक असलेल्या रीतीने माहिती पुरविण्यात आल्यावर तद्नुसार नोंदणी प्रमाणपत्रात सुधारणा करण्यात येईल.

१७. **नोंदणी प्रमाणपत्र रद्द करणे.**—(१) ज्याबाबतीत,—

(क) या नियमांच्या नियम ९ च्या पोट-नियम (३) अन्वये नोंदणीकृत व्यापारी म्हणून नोंदणी झाल्याचे मानण्यात आलेल्या व्यापाऱ्याच्या धंद्यासह कोणत्याही धंद्याच्या बाबतीत या नियमान्वये नोंदणी प्रमाणपत्र देण्यात आलेले आहे असा कोणताही धंदा बंद करण्यात आला असेल किंवा हस्तांतरित करण्यात आला असेल किंवा अन्यथा निकालात काढण्यात आला असेल, किंवा

(ख) नोंदणीकृत व्यापाऱ्याच्या एकूण विक्रीची उलाढाल किंवा खरेदीची उलाढाल कोणत्याही वर्षामध्ये नियम ९ च्या पोट-नियम (३) अन्वये नोंदणीकृत व्यापारी म्हणून नोंदणी झाल्याचे मानण्यात आलेल्या व्यापाऱ्यासह या नियमान्वये विहित करण्यात आलेल्या संबंधित मर्यादेहून अधिक झालेली नसेल,

त्या बाबतीत तो व्यापारी आपले नोंदणी प्रमाणपत्र रद्द करण्यासाठी विहित केलेल्या रितीने अर्ज करील आणि आयुक्त, त्यास योग्य वाटेल अशी चौकशी केल्यानंतर असे नोंदणी प्रमाणपत्र या नियमानुसार तो निश्चित करील अशा दिनांकापासून रद्द करील:

परंतु, ज्याच्या बाबतीत या नियमाअन्वये नोंदणी प्रमाणपत्र देण्यात आलेले असेल असा कोणताही धंदा बंद झाला आहे किंवा हस्तांतरित करण्यात आला आहे किंवा निकालात काढण्यात आला आहे आणि उपरोक्तानुसार नोंदणी व्यापाऱ्याने आपले नोंदणी प्रमाणपत्र रद्द करण्यासाठी अर्ज केलेला नाही याबद्दल आयुक्ताची खात्री झाली असेल त्याबाबतीत, आयुक्ताला व्यापाऱ्यास आपले म्हणणे मांडण्याची वाजवी संधी दिल्यानंतर, धंदा ज्या दिनांकास बंद करावयाचा किंवा हस्तांतरित करावयाचा किंवा यथास्थिति निकालात काढावयाचा म्हणून दिनांक निश्चित करील त्या दिनांकापासून नोंदणी प्रमाणपत्र रद्द करता येईल :

परंतु, आणखी असे की, व्यापाऱ्याने अर्ज केल्यावरून किंवा अन्यथा नोंदणी प्रमाणपत्र रद्द झाल्यामुळे, नोंदणी प्रमाणपत्र रद्द झाल्याच्या दिनांकापूर्वीच्या कोणत्याही कालावधीसाठी देय असलेल्या स्थानिक संस्था कर व कोणताही दंड, व्याज व जप्त करण्यात आलेली रक्कम भरण्याच्या व्यापाऱ्याच्या दायित्वास बाधा येणार नाही. मग अशा स्थानिक संस्था कर आणि कोणताही दंड, व्याज व जप्त रक्कम नोंदणी प्रमाणपत्र रद्द होण्याच्या दिनांकापूर्वी आकारण्यात किंवा ठरविण्यात आलेली असताना ती अदत्त राहिलेली असो किंवा ती त्यानंतर आकारण्यात किंवा ठरविण्यात आलेली असो :

परंतु, तसेच, या नियमाच्या प्रयोजनार्थ या पोट-नियमाच्या पूर्वगामी तरतुदीअन्वये आयुक्ताने नोंदणी प्रमाणपत्र रद्द झाल्याचा दिनांक म्हणून जो दिनांक निश्चित केला असेल त्या दिनांकापासून असा व्यापारी नोंदणीकृत व्यापारी नसल्याचे मानण्यात येईल.

(२) नोंदणी प्रमाणपत्र रद्द करण्यासाठी करावयाचा अर्ज आयुक्ताकडे नमुना "ग" मध्ये करण्यात येईल.

(३) अर्ज परिपूर्ण आहे याबाबत आयुक्तांचे समाधान झाले तर तो लेखी आदेशाद्वारे पोट-नियम (४) अनुसार निश्चित करण्यात येईल अशा दिनांकापासून नोंदणी प्रमाणपत्र रद्द करील आणि अशा व्यापाऱ्याचे नाव, पत्ता आणि नोंदणी क्रमांक व ज्या दिनांकापासून असे नोंदणी प्रमाणपत्र रद्द करण्यात येईल तो दिनांक महानगरपालिकेच्या सूचना फलकावर नोटीस लावून प्रसिद्ध करील. अशा आदेशाची एक प्रत व्यापाऱ्यावर बजावण्यात येईल.

(४) **नोंदणी प्रमाणपत्रे.**—(क) पोट-नियम (१) च्या खंड (क) मध्ये निर्दिष्ट करण्यात आलेल्या कारणासाठी रद्द करावयाची असेल अशा बाबतीत, धंदा ज्या दिनांकास बंद करण्यात आला आहे किंवा हस्तांतरित करण्यात आला आहे किंवा अन्यथा निकालात काढण्यात आला आहे तो दिनांक नोंदणी रद्द करण्याचा दिनांक असेल.

(ख) पोट-नियम (१) च्या खंड (ख) मध्ये निर्दिष्ट करण्यात आलेल्या कारणासाठी रद्द करण्यात आले असेल तर या नियमाच्या पोट-नियम (३) अन्वये ज्या दिनांकास नोटीस प्रसिद्ध करण्यात आली असेल अशा दिनांकाच्या लगत नंतरच्या महिन्याच्या पहिल्या दिनांकानंतरचा नसेल असा दिनांक हा नोंदणी रद्द करण्याचा दिनांक असेल.

(५) उप-खंड (१) च्या पहिल्या परंतुका अन्वये व्यापाऱ्याचे नोंदणी प्रमाणपत्र रद्द करावयाचे असेल, अशा बाबतीत आयुक्त, अशा व्यापाऱ्याला आपली बाजू मांडण्याची वाजवी संधी दिल्यानंतर, धंदा ज्या दिनांकाला बंद करावयाचा किंवा हस्तांतरित करावयाचा किंवा, यथास्थिति, निकालात काढावयाचा दिनांक म्हणून निश्चित करील त्या दिनांकापासून लेखी आदेशाद्वारे नोंदणीचे प्रमाणपत्र रद्द करील आणि महानगरपालिकेच्या सूचना फलकावर नोटीस लावून अशा व्यापाऱ्याचे नाव, पत्ता व नोंदणी क्रमांक आणि ज्या दिनांकापासून रद्द करणे अंमलात येईल तो दिनांक प्रसिद्ध करील. अशा आदेशाची एक प्रत व्यापाऱ्यावर बजावण्यात येईल.

(६) व्यापाऱ्याने आवेदनपत्र दाखल केल्यावरून किंवा या नियमाच्या उप-नियम (१) खंड (ख) च्या पहिल्या परंतुकान्वये जर व्यापाऱ्याचे नोंदणी प्रमाणपत्र रद्द करण्यात आले असेल तर, व्यापाऱ्याला नोंदणी प्रमाणपत्र रद्द करण्यात आल्याचा आदेश मिळाल्याच्या दिनांकापासून पंधरा दिवसांच्या आत त्याला देण्यात आलेले नोंदणी प्रमाणपत्र आणि त्याच्या प्रती देण्यात आल्या असतील तर, त्या आयुक्ताकडे परत करील.

(७) एखाद्या व्यापाऱ्याला आदेशाद्वारे प्रतिभूती देण्यास फर्माविण्यात आले असेल आणि त्याने प्रतिभूती दिली नसेल अशा बाबतीत, आयुक्त, व्यापाऱ्याला आपली बाजू मांडण्याची वाजवी संधी दिल्यानंतर, अशा व्यापाऱ्याचे नोंदणी प्रमाणपत्र लेखी आदेशाद्वारे रद्द करील आणि अशा व्यापाऱ्याचे नाव, पत्ता आणि नोंदणी क्रमांक स्थानिक वर्तमानपत्रात प्रसिद्ध करून हा आदेश सर्वसाधारण जनतेच्या निदर्शनास आणील.

१८. **धंद्याच्या व्यवस्थापकाचे नाव व्यापाऱ्याने जाहीर करणे.**—जी हिंदू अविभक्त कुटुंबातील, किंवा संघ, किंवा क्लब, किंवा संस्था, किंवा भागीदारी संस्था, किंवा कंपनी यातील व्यक्ती असेल किंवा जो व्यक्ती अन्य व्यक्तींच्या वतीने पालक, किंवा विश्वस्त म्हणून किंवा अन्यथा धंदा चालवित असेल असा प्रत्येक नोंदणीकृत व्यापारी या नियमाच्या प्रयोजनासाठी, एका महिन्याच्या आत, व्यवस्थापक म्हणून किंवा अशा व्यापाऱ्याच्या धंद्याचा व्यवस्थापक म्हणून ज्या व्यक्तीस समजण्यात येईल अशा व्यक्तीचे किंवा व्यक्तींची नावे नमूद केलेले "च" नमुन्यातील एक प्रतिज्ञापत्र आयुक्ताला पाठवील. अशा प्रतिज्ञापत्रामध्ये वेळोवेळी सुधारणा करण्यात येईल.

१९. **व्यापाऱ्यांनी विवक्षित नोंदवही ठेवणे.**—प्रत्येक व्यापारी खरेदी केलेल्या आणि हस्तांतरणाच्या तत्त्वावर मिळालेल्या मालाची नमुना-छ मध्ये एक नोंदवही ठेवील.

२०. **गृहीतक आणि सिद्धिभार.**—(१) शहराच्या क्षेत्रातील एखाद्या नोंदणीकृत व्यापाऱ्याने शहराच्या क्षेत्रातील इतर कोणत्याही नोंदणीकृत व्यापाऱ्याकडून अनुसूची "क" मध्ये विनिर्दिष्ट केलेला कोणताही माल खरेदी केला असेल तर, अशा मालाच्या संबंधातील स्थानिक संस्था कर भरण्यास तो पात्र नाही असे सिद्ध करण्याच्या प्रयोजनासाठी नियम २१ मध्ये तरतूद केल्याप्रमाणे विक्री करणाऱ्या व्यापाऱ्याने दिलेले प्रमाणपत्र आयुक्त ज्यावेळेस मागणी करील तेव्हा ते प्रमाणपत्र तो आयुक्तास सादर करील. आयुक्त, त्यास आवश्यक वाटेल अशी चौकशी केल्यानंतर, देण्यात आलेले प्रमाणपत्र खरे आणि अचूक आहे अशी त्याची खात्री पटेल तर, तो, या नियमान्वये व्यापाऱ्याकडून देय असलेल्या स्थानिक संस्था कराच्या निर्धारणाच्या वेळी किंवा निर्धारणापूर्वी तशा आशयाचा आदेश देईल आणि त्यानंतर, या नियमाच्या प्रयोजनासाठी प्रथम नमूद केलेला नोंदणीकृत व्यापारी हा, उपरोक्त मालाच्या संबंधातील स्थानिक संस्था कर भरण्यास पात्र नाही, असे समजण्यात येईल.

(२) एखाद्या व्यापाऱ्याने किंवा एखाद्या व्यक्तीने शहराच्या हद्दीच्या आत अनुसूची "क" मध्ये विनिर्दिष्ट केलेला कोणताही माल आयात करण्यात आला असल्याच्या विरुद्ध काहीही सिद्ध होत नाही तोपर्यंत, हा माल शहराच्या हद्दीमध्ये उपभोग, उपयोग किंवा त्याचे विक्रीसाठी आयात करण्यात आला आहे किंवा, यथास्थिति, शहराच्या क्षेत्राबाहेरील कोणत्याही ठिकाणी त्याच्या वाहनांतरणासाठी आयात करण्यात आला आहे असे गृहीत धरण्यात येईल.

२१. **विवक्षित प्रकरणांमध्ये विक्री करणाऱ्या व्यापाऱ्यांनी द्यावयाची प्रमाणपत्रे.**—शहराच्या क्षेत्रामध्ये कोणताही माल जो व्यापारी धारण करीत असेल त्याने असा माल, शहराच्या क्षेत्रातील कोणत्याही इतर व्यापाऱ्यास विकला असेल तर, त्या बाबतीत, विक्री करणारा व्यापारी नियम २२ द्वारे तरतूद करण्यात आले असेल अशारीतीने आणि अशा तपशील विनिर्दिष्ट केलेले, एक देयक, बीजक आणि रोखीचे टिपण अंतर्भूत असलेले एक प्रमाणपत्र खरेदी करणाऱ्या व्यापाऱ्यास देईल.

२२. **देयक, बीजक किंवा रोखीचे टिपण यामध्ये विनिर्दिष्ट करावयाचे तपशील.**—व्यापाऱ्याकडून विकण्यात येणाऱ्या किंवा पुरविण्यात येणाऱ्या मालाच्या संबंधात एखादे देयक, बीजक किंवा रोखीचे टिपण त्याने देणे आवश्यक आहे, असा प्रत्येक व्यापारी त्याच्याकडून देण्यात येणाऱ्या त्या देयकात किंवा रोखीच्या टिपणात त्याच्या धंद्याचे संपूर्ण नाव आणि स्वरूप, त्याच्या धंद्याच्या ठिकाणाचा पत्ता आणि त्याच्या नोंदणी प्रमाणपत्राचा क्रमांक, विकण्यात आलेल्या वस्तूचा तपशील व त्याची विक्री किंमत विनिर्दिष्ट करील आणि,—

(क) ते देयक, बीजक किंवा रोखीचे टिपण एखाद्या नोंदणीकृत व्यापाऱ्याने दिलेले असेल त्या बाबतीत त्या देयकात, बीजकात किंवा रोखीच्या टिपणात पुढीलप्रमाणे एक प्रमाणपत्र अंतर्भूत असेल, ते असे :—

"मी / आम्ही याद्वारे प्रमाणित करतो की, या नियमाखालील माझे / आमचे नोंदणी प्रमाणपत्र हे या देयकात, बीजकात किंवा रोखीच्या टिपणात विनिर्दिष्ट केलेल्या मालाच्या विक्री ज्या दिनांकास माझ्याकडून / आमच्याकडून करण्यात आलेली आहे, त्या दिनांकास अंमलात आलेले आहे आणि या देयकाद्वारे / बीजकाद्वारे / रोखीच्या टिपणाद्वारे समाविष्ट होणारा विक्रीचा व्यवहार माझ्या / आमच्या धंद्याच्या संदर्भात माझ्याकडून / आमच्याकडून करण्यात आलेला आहे."

(ख) विक्री किंमत रुपये ५०० पेक्षा कमी नसेल त्याबाबत तो व्यापारी, त्या देयकात, बीजकात किंवा रोखीच्या टिपणात विकत घेणाऱ्याचे (कोणतेही असल्यास) संपूर्ण नाव आणि धंद्याचे स्वरूप आणि त्याचा पत्ता व या नियमान्वये त्याने धारण केलेल्या कोणत्याही नोंदणी प्रमाणपत्राचा क्रमांक यांचीही नोंद करील.

२३. **अनुसूची "क" ची अधिसूचना आणि त्यामध्ये नमूद केलेल्या वस्तूंच्या संबंधातील स्थानिक कराचे दर ठरविणे.**— स्थानिक संस्था कर अंमलात आहे अशा क्षेत्रातील महापालिका आयुक्त, पुढील वर्षामध्ये स्थानिक संस्था कर ज्या वस्तूवर बसवावयाचा त्याचा उद्देश आहे त्यांची सूची आणि ज्या दराने उक्त कर वसूल करण्याचा त्याचा उद्देश असेल तो दर, त्याच्या समर्थनासह लगत मागील वर्षाच्या १ जानेवारी रोजी किंवा त्यापूर्वी शासनाला सादर करील आणि त्यानंतर प्रत्येक वस्तूच्या बाबतीत स्थानिक संस्था कराचा दर शासन निर्धारित करील आणि अनुसूची "क" म्हणून तो दर अशा वर्षाच्या २० फेब्रुवारी रोजी किंवा त्यापूर्वी शासकीय राजपत्रात अधिसूचित करील आणि आयुक्त नंतर पुढील वर्षामध्ये, अनुसूची "क" मध्ये नमूद केलेल्या प्रत्येक वस्तूच्या बाबतीत शासनाने निर्धारित केलेल्या दराने अशा वस्तूच्या बाबतीत स्थानिक संस्था कर वसूल करील. नंतरच्या वर्षामध्ये, अनुसूची "क" मध्ये नमूद केलेल्या वस्तूंमध्ये किंवा त्यास लागू असलेला स्थानिक संस्था कराचा दर यामध्ये फक्त बदल असतील तरच ते शासनास शासकीय राजपत्रात अधिसूचित करता येतील आणि शासकीय राजपत्रात शासनाने असे बदल अधिसूचित केले असतील तोपर्यंत मागील वर्षी संबंधी महापालिकेसाठी शासनाने निर्धारित केलेले दर हे, अनुसूची "क" मध्ये नमूद केलेल्या संबंधित वस्तूंना लागू असणे सुरू राहील.

२४. **विवक्षित प्रकरणामध्ये निश्चित करावयाचे प्रशुल्क मूल्ये.**—अनुसूची "क" मध्ये विनिर्दिष्ट केलेल्या कोणत्याही मालाच्या आयातीच्या संबंधात देय असलेला स्थानिक संस्था कर टाळण्यास प्रतिबंध करण्यासाठी तसे करणे आवश्यक किंवा इष्ट आहे, अशी आयुक्तांची खात्री झाली असेल तर, या नियमामध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, त्यास अशा किंवा तत्सम मालाच्या मूल्याचा कल लक्षात घेऊन, महानगरपालिकेच्या सूचना फलकावर असे प्रशुल्क प्रदर्शित करून, वेळोवेळी, अशा कोणत्याही मालासाठी प्रशुल्क मूल्य निश्चित करता येईल आणि तशी कोणतीही प्रशुल्क मूल्ये निश्चित करण्यात आली असतील त्या बाबतीत या नियमान्वये स्थानिक संस्था कराची वसुली अशा प्रशुल्क मूल्याच्या संदर्भात असेल आणि अशा मालाच्या संबंधातील कोणत्याही दस्तऐवजामध्ये दर्शविण्यात आलेल्या मूल्याच्या संदर्भात नसेल.

२५. **रास्त बाजारमूल्य निर्धारित करणे.**—(१) शहराच्या हद्दीमध्ये उपभोग, उपयोग किंवा शहरातील विक्री यासाठी आयात झालेल्या कोणत्याही मालाच्या बाबतीत, कोणत्याही कारणासाठी आयुक्तांचे असे मत असेल की, संबंधित व्यक्तीमधील विक्रीच्या किंवा, यथास्थिति, खरेदीच्या कोणत्याही व्यवहाराच्या संबंधात एखाद्या व्यापाऱ्याने किंवा एखाद्या व्यक्तीने दाखविलेली अशा मालाच्या विक्रीची किंवा यथास्थिती खरेदीची किंमत ही रास्त बाजार मूल्यापेक्षा कमी आहे तर, या नियमाखालील कोणत्याही कार्यवाहीसाठी कोणताही आदेश संमत करण्याच्या प्रयोजनासाठी, आयुक्तास, अशा व्यापाऱ्यास किंवा अशा व्यक्तीस तिचे म्हणणे ऐकून घेण्याची वाजवी संधी दिल्यानंतर, अशा मालाचे रास्त बाजार मूल्य निर्धारित करता येईल.

(२) शहराच्या हद्दीमध्ये उपभोग, उपयोग किंवा शहरातील विक्री यासाठी कोणत्याही व्यापाऱ्याने किंवा कोणत्याही व्यक्तीने आयात केलेल्या कोणत्याही मालाच्या बाबतीत विक्री किंमत किंवा यथास्थिति, खरेदी किंमत निश्चित केलेली नसेल किंवा विक्री किंवा खरेदीद्वारे माल मिळविलेला नसेल त्याबाबतीत, या नियमाखालील कोणत्याही कार्यवाहीसाठी कोणताही आदेश संमत करण्याच्या प्रयोजनासाठी, आयुक्तास अशा व्यापाऱ्यास किंवा, यथास्थिति, अशा व्यक्तीस तिचे म्हणणे ऐकून घेण्याची वाजवी संधी दिल्यानंतर अशा वस्तूंचे रास्त बाजार मूल्य निर्धारित करता येईल.

२६. **मार्गस्थ मालाची तपासणी.**—(१) स्थानिक संस्था कर टाळण्यास प्रतिबंध करण्याच्या दृष्टीने आयुक्ताने तसा आदेश दिला असता शहराच्या क्षेत्रातील कोणत्याही वाहनास थांबवले जावे आणि वाहनाच्या (परिवहन वाहन धरून) चालकाद्वारे किंवा वाहन प्रभारी व्यक्तीद्वारे ते आवश्यक असेल तेवढा वेळ स्थिर ठेवले जावे आणि अशा व्यक्तीने, आयुक्ताला त्या वाहनातील सामानाची तपासणी करू द्यावी आणि वाहनातून वाहून नेण्यात येणाऱ्या मालासंबंधीत चालकाच्या किंवा प्रभारी व्यक्तीच्या ताब्यातील सर्व कागदपत्रांचे निरिक्षण करू द्यावे व आवश्यक वाटल्यास आपले नाव व पत्ता आणि त्या वाहनाच्या मालकाचे त्याचप्रमाणे अशा मालाच्या मालप्रेषक व मालप्रेषित यांची नावे व पत्ते द्यावेत.

(२) एखादा व्यापारी जो शहराच्या हद्दीत आहरूक करीत असलेल्या मालाच्या मालकी संबंधीचे दस्तऐवज सादर करण्यास असमर्थ असेल तर त्याने अन्यथा सिद्ध न केल्यास अधिनियमात किंवा नियमात काहीही अंतर्भूत असली तरी, अशा मालासंबंधीचा स्थानिक संस्था कर, त्यावरील देय व्याज व यथास्थिती दंडाची रक्कम या नियमातील तरतुदीनुसार भरण्यास पात्र राहील.

(३) या नियमाखाली दिलेल्या अधिकाराचा वापर आयुक्त किंवा आयुक्तांच्या पूर्वपरवानगीने उप-आयुक्त पेक्षा कमी नसलेल्या दर्जाचे अधिकारी करील.

२७. **स्थानिक संस्था कराच्या ठोस रकमेचे प्रदाने.**—(१) या नियमाच्या तरतुदींच्या अधीनतेने, कोणत्याही नोंदणीकृत व्यापाऱ्याची वर्षभरातील उलाढाल रुपये पाच लाखापेक्षा कमी असेल तर, खालील तक्त्याने विनिर्दिष्ट केलेल्या ठोक रकमेने स्थानिक संस्था कर भरण्याचा पर्याय स्वीकारल्यास, तो या नियमान्वये विहित नमुना "द" मधील प्रतिज्ञापत्र सादर करील.

त्याने नमुना "द" मधील असे प्रतिज्ञापत्र सादर केल्यानंतर, आयुक्त खालील तक्त्यात विनिर्दिष्ट केलेल्या टप्प्यानुसार अर्जदाराचा पर्याय योग्य आहे याबद्दल त्याची खात्री पटली तर, तो पुढील तक्त्यात विनिर्दिष्ट केल्यानुसार स्थानिक संस्था कराची ठोक रक्कम भरण्यास परवानगी देण्याचा त्याच्या आदेशात विनिर्दिष्ट केला असेल अशा कालावधीत आणि अशा दिनांकास भरण्यास त्याला परवानगी देईल. आणि व्यापारी, त्याला असा आदेश मिळाल्याच्या दिनांकापासून पंधरा दिवसांच्या आत स्थानिक संस्था कराची अशी ठोक रक्कम प्रदान करील.

परंतु, या नियमान्वये, ज्या व्यापाऱ्यास स्थानिक संस्था कराची ठोक रक्कम प्रदान करण्याची परवानगी देण्यात आली आहे, त्याने या नियमामध्ये करारनिर्दिष्ट केलेल्या वेळेच्या आत अशी रक्कम भरण्यास कसूर केल्यास, या प्रयोजनार्थ आयुक्ताने दिलेली परवानगी अशी वेळ समाप्त झाल्यावर तात्काळ काढून घेण्यात आल्याचे समजले जाईल.

परंतु आणखी असे की, या नियमांच्या प्रयोजनार्थ करारनिर्दिष्ट वेळेपासून तीन महिन्यांच्या आणखी कालावधीच्या आत किंवा अशी परवानगी, ज्यावर्षी देण्यात आली होती ते वर्ष यापैकी जे आगोदर घडेल ते अशा रकमेचे प्रदान नियम ४८, पोट-नियम (३), खंड (क) च्या तरतुदीन्वये त्यावरील आकारणीयोग्य व्याजासह करण्यात आल्यास, आयुक्त, या नियमाखाली यापूर्वी दिलेल्या परवानगीनुसार, अशी रक्कम प्रदान केल्याचे समजेल.

(२) आयुक्ताने व्यापाऱ्याला पोट-नियम (१) च्या तरतुदीअन्वये स्थानिक संस्था कराची रक्कम प्रदान करण्यास ज्यावर्षी परवानगी दिली असेल किंवा यथास्थिति, ज्या कोणत्याही पुढील वर्षी अशी परवानगी अंमलात असणे चालू असेल त्यावर्षी, अशा व्यापाऱ्याच्या सर्व खरेदीची उलाढाल अशा टप्प्यापेक्षा अधिक झाली असेल तर, याखाली विनिर्दिष्ट केलेल्या तक्त्यामधील टप्प्यानुसार, अशा वर्षासाठीची त्याला प्रदेय असलेल्या स्थानिक संस्था कराच्या रकमेइतकी स्थानिक संस्था कराच्या फरकाची रक्कम ही, अशी उलाढाल अशा मर्यादेपेक्षा वाढल्यामुळे किंवा अशा वर्षात सर्व खरेदीची त्याची उलाढाल पाच लाख रुपयांपेक्षा वाढल्यास, अशी स्थानिक संस्था कराच्या फरकाची रक्कम आवश्यक असल्याप्रमाणे त्याने प्रदान केलेला स्थानिक संस्था कर हा, या नियमाखाली अन्यथा त्याला प्रदेय असलेल्या रकमेपेक्षा कमी असणार नाही.

(३) आयुक्तास, या नियमांच्या तरतुदींखाली स्थानिक संस्था कराची ठोक रक्कम भरण्यास ज्या व्यापाऱ्यास परवानगी देण्यात आली असेल त्याच्या विक्रीची उलाढाल किंवा खरेदीची उलाढाल ही, या नियमाच्या प्रयोजनार्थ, सादर केलेल्या नमुना "द" मध्ये त्याने घोषित केलेल्या मर्यादेपेक्षा अधिक असल्याबाबत विश्वास ठेवण्यास कारण असेल तर, अशा व्यापाऱ्यास, त्याचे म्हणणे मांडण्याची वाजवी संधी दिल्यावर, त्याला ज्या वर्षासाठी, ज्या उलाढालीसाठी परवानगी देण्यात आली होती अशी उलाढाल, याखालील तक्त्यामध्ये विनिर्दिष्ट केलेल्या मर्यादेपेक्षा अधिक असेल तर त्या वर्षापासून अशी परवानगी रद्द करता येईल. अशा आदेशाची एक प्रत व्यापाऱ्याला देण्यात येईल.

| टप्पा क्रमांक | वर्षभरातील सर्व खरेदीची उलाढाल | दरवर्षी प्रदेय असलेला स्थानिक संस्था कर |
|---|---|---|
| (१) | (२) | (३) |
| | | रुपये |
| १ | रु. १,००,००० पर्यंत .. | काही नाही. |
| २ | रु. १,००,००० पेक्षा अधिक परंतु, रुपये २,००,००० पेक्षा अधिक नसेल. .. | २,००० |
| ३ | रु. २,००,००० पेक्षा अधिक परंतु, रु. ३,००,००० पेक्षा अधिक नसेल. .. | ३,००० |
| ४ | रु. ३,००,००० पेक्षा अधिक परंतु, रु. ४,००,००० पेक्षा अधिक नसेल. .. | ४,००० |
| ५ | रु. ४,००,००० पेक्षा अधिक परंतु, रु.५,००,००० पेक्षा अधिक नसेल. | ५,००० |

२८. **विवक्षित प्रकरणांमध्ये सूट.**—(१) राज्य शासनाने किंवा केंद्र सरकारने शहरात आयात केलेला माल शासनाच्या मालकीचा असून तो सार्वजनिक प्रयोजनासाठी आयात केलेला आहे आणि त्याचा उपयोग लाभ मिळविण्यासाठी केला जात नाही किंवा करण्याचा उद्देश नाही असे प्रमाणित करणारे संबंधित शासनाने यासाठी अधिकार प्रदान केलेल्या अधिकाऱ्याने दिलेले प्रमाणपत्र सादर करण्यात आल्यानंतर अशा आयात केलेल्या मालांवर कोणताही स्थानिक संस्था कर बसविण्यात येणार नाही.

(२) राज्य शासनाच्या किंवा केंद्र सरकारच्या वतीने किंवा त्यांच्यासाठी शहराच्या सीमांमध्ये आयात केलेला माल शासनाच्या मालकीचा असून तो सार्वजनिक प्रयोजनासाठी आयात केलेला आहे आणि त्याचा उपयोग लाभ मिळविण्यासाठी केला जात नाही किंवा करण्याचा उद्देश नाही असे प्रमाणित करणारे संबंधित शासनाने यासाठी अधिकार प्रदान केलेल्या अधिकाऱ्याने दिलेले प्रमाणपत्र तो माल आयात केलेल्या दिनांकापासून सहा महिन्यांच्या कालावधीत सादर करण्यात आल्यानंतर अशा आयात केलेल्या मालावर कोणताही स्थानिक संस्था कर बसविण्यात येणार नाही.

(३) एखाद्या व्यापाऱ्याने किंवा व्यक्तीने शहरामध्ये बाळगलेला कोणताही माल, या नियमाच्या स्पष्टीकरणामध्ये नमूद करण्यात आलेल्या प्रक्रिया त्यावर करण्यासाठी शहराबाहेर हलविण्यात येईल आणि त्या मालाची स्थिती किंवा बाह्यस्वरूप त्याचप्रमाणे मालकी यामध्ये बदल न होता तो पुनः आयात करण्यात येईल, तर शहराबाहेर हलविलेल्या मालाचे मूल्य प्रक्रिया केलेल्या फेर आयातीतील मालाच्या एकूण मूल्यामधून वजा करण्याची मुभा देण्यात येईल आणि केवळ भर पडलेल्या मूल्यावर म्हणजेच प्रक्रियेचा खर्च, स्थानांतरणाचा खर्च इत्यादींवर स्थानिक संस्था कर बसविण्यायोग्य असेल :

परंतु, मालाची शहराबाहेर निर्यात केल्याच्या दिनांकापासून सहा महिन्यांच्या आत त्याची फेर आयात झालेली असली पाहिजे आणि व्यापाऱ्याने संबंधित कालावधीच्या विवरणामध्ये अशा निर्यातीची माहिती दिलेली असली पाहिजे.

(४) शहरातील कोणताही व्यापारी, या नियमाखालील स्पष्टीकरणामध्ये नमूद केलेली कोणतीही प्रक्रिया कामाच्या तत्त्वावर करण्यासाठी शहराबाहेरील कोणत्याही ठिकाणाहून कोणताही माल आयात करील आणि प्रक्रिया करण्यात आलेला माल त्याची आयात केल्यापासून सहा महिन्यांच्या आत निर्यात केलेला आहे आणि निर्यातीच्या वेळी त्या मालाच्या मालकीमध्ये व स्वरूपामध्ये कोणताही बदल झालेला नव्हता अशी आयुक्तांची खात्री पटेल अशा प्रकारे सिद्ध करील तर, पुढील शर्तींच्या अधीन राहून त्या मालावर कोणताही स्थानिक संस्था कर बसविण्यात येणार नाही, त्या शर्ती अशा :—

(एक) व्यापाऱ्याने अशा मालाचे मूल्य संबंधित कालावधीच्या विवरणपत्रामध्ये दाखविले पाहिजे.

(दोन) व्यापाऱ्याने आयुक्त या संबंधात ठरवून देईल अशी अनामत रक्कम हमी म्हणून भरली पाहिजे. तथापि, नियमित तत्त्वावर प्रक्रिया करण्यासाठी मालांची आयात करणाऱ्या व्यापाऱ्यास आयुक्ताने वेळोवेळी निश्चित केले असेल त्याप्रमाणे स्थायी स्वरूपाची म्हणून ठेव ठेवता येईल.

**स्पष्टीकरण.**—पोट-नियम (३) व (४) यांच्या प्रयोजनासाठी "प्रक्रिया करणे" यात पुढील गोष्टींचा अंतर्भाव असेल :-

(एक) भरडणे, रंगविणे, विरंजन करणे, रंगलेप देणे, छपाई करणे, शेवटचा हात देणे, स्टेंटरिंग (Stentering), भरतकाम करणे, डबलिंग (Doubling), ट्विस्टींग (Twisting), धातुरूप देणे (Metalising) आणि विद्युतविलेपन.

(दोन) सांगाडे बांधून ते सर्व प्रकारच्या वाहनांच्या सांगाड्यावर (Chassis) बसविणे आणि त्यामध्ये आयुक्त वेळोवेळी मान्यता देईल अशा इतर प्रक्रियांचादेखील समावेश होईल.

आयुक्तांचा या संबंधातील निर्णय अंतिम राहील.

(५) शहरामध्ये बाळगलेला कोणताही माल शहराबाहेर विकण्यात येईल आणि निर्यात करण्यात येईल आणि खरेदीदाराकडून माल नाकारल्यामुळे तो परत मिळाला असेल तेव्हा अशा मालावर कोणताही स्थानिक संस्था कर बसविण्यात येणार नाही. मात्र तो माल त्याच्या निर्यातीच्या दिनांकापासून सहा महिन्यांच्या कालावधीत शहरात परत मिळालेला असला पाहिजे. आणि अशा मालाची विक्री संबंधित कालावधीच्या विवरणात दाखविलेली होती असे व्यापाऱ्याने आयुक्ताची खात्री पटेल अशा प्रकारे सिद्ध केले पाहिजे.

(६) भारताच्या क्षेत्राबाहेर मालांची निर्यात करणाऱ्या नोंदणीकृत व्यापाऱ्यास अशी निर्यात करण्याच्या प्रयोजनासाठी वापरण्यात आलेल्या मालांच्या मूल्याच्या संबंधातील स्थानिक संस्था कराच्या आकारणीमधून सूट देण्यात येईल.

२९. **विवरणपत्रे सादर करणे.**—(१) प्रत्येक नोंदणीकृत व्यापारी, या नियमाच्या अधीनतेने, त्याने किंवा त्याने नमुना "च" मध्ये नामनिर्देशित केलेल्या व्यक्तीने यथोचितरित्या स्वाक्षरी केलेले त्याचे नमुना ड - एक मधील सहामाही विवरणपत्र व नमुना ड - दोन मधील वार्षिक विवरणपत्र आयुक्तास सादर करील.

(२) या नियमांच्या तरतुदींच्या अधीनतेने,—

(क) या नियमांच्या नियम २७ च्या तरतुदींखाली स्थानिक संस्था कराची ठोक रक्कम प्रदान करण्याचा पर्याय ज्या नोंदणीकृत व्यापाऱ्याने स्वीकारला असेल असा प्रत्येक व्यापारी अशी विवरणपत्रे ज्या कालावधीशी संबंधित असतील अशा दिनांक १ एप्रिलपासून सुरू होणाऱ्या किंवा स्थानिक संस्था कराची अशी ठोक रक्कम प्रदान करण्यास त्याला परवानगी देणारा आदेश ज्या महिन्यापासून परिणामक करण्यात आला असेल त्या महिन्याच्या पहिल्या दिवसापासून आणि वर्षाच्या ३१ मार्च रोजी समाप्त होणाऱ्या कालावधीपर्यंतची विवरणपत्रे नमुना ड-२ मध्ये सादर करील. असा व्यापारी, अशी परवानगी ज्या वर्षासाठी देण्यात आली असेल त्या पुढच्या वर्षी असे विवरणपत्र दाखल करील. असे विवरणपत्र ज्या वर्षाशी संबंधित असेल त्या वर्षाच्या अखेरीपासून पंधरा दिवसांच्या आत सादर करण्यात येईल.

(ख) या पोट नियमाच्या खंड (क) द्वारे ज्याचा समावेश झाला नाही अशा प्रत्येक नोंदणीकृत व्यापाऱ्यास वर्षातील पहिल्या सहा महिन्यांसाठीचे सहामाही विवरणपत्र नमुना ड-१ मध्ये हा कालावधी समाप्तीनंतर पंधरा दिवसांच्या आत व संबंधित वर्षातील वार्षिक विवरणपत्र नमुना ड-२ मध्ये वर्ष संपल्यानंतर पंधरा दिवसांच्या आत सादर करेल.

(३) पोट-नियम (१) मध्ये काहीही अंतर्भूत असले तरी परंतु या पोटनियमातील तरतुदींच्या अधीन आयुक्तास, नमुना छ मधील आदेशाद्वारे वेळोवेळी निरनिराळे व्यापारी किंवा नोंदणीकृत व्यापारी - नोंदणीकृत नसलेले व्यापारी व व्यक्ती यांच्या वेगवेगळ्या वर्गासाठी विवरणपत्रे सादर करण्याच्या प्रयोजनासाठी वेगवेगळा कालावधी किंवा दिनांक विनिर्दिष्ट करता येतील :

परंतु, आयुक्तास, कोणत्याही अशा व्यापाऱ्यास किंवा व्यापाऱ्याच्या वर्गाला विवरणे सादर करण्यापासून सूट देता येईल किंवा कोणत्याही अशा व्यापाऱ्यास किंवा व्यापाऱ्याच्या वर्गाला पुढील गोष्टींसाठी परवानगी देता येईल-

(क) अशा निरनिराळ्या कालावधीसाठी विवरणे सादर करणे, किंवा

(ख) अशा कालावधीसाठी किंवा अशा निरनिराळ्या कालावधीसाठी शहरातील त्याच्या सर्व किंवा कोणत्याही धंद्याच्या ठिकाणाशी संबंधित एकत्रित विवरणे आयुक्त निदेश देईल अशा प्राधिकरणाकडे आणि अशा नमुन्यात सादर करणे.

(४) या नियमाच्या पोट नियम (१), (२) किंवा (३) अन्वये ज्यांनी विवरणपत्रे दिलेली आहेत अशा कोणत्याही व्यापाऱ्याला, नोंदणी न केलेल्या व्यापाऱ्याला किंवा व्यक्तीला त्यामध्ये कोणतीही बाब वगळण्याचे किंवा चुकीचे विधान केल्याचे आढळून आल्यास त्यास मूळ विवरणपत्र भरण्याकरिता विहित केलेल्या अंतिम दिनांकानंतर पुढील एक महिना समाप्त होण्यापूर्वी त्या संबंधित कालावधीचे सुधारित विवरण देता येईल.

(५) नियम ३ च्या उप-नियम २ अन्वये नोंदणीस पात्र असलेल्या प्रत्येक व्यापारी किंवा व्यक्ती धंदा सुरू असलेल्या कालावधीतील प्रत्येक महिन्याच्या अखेरच्या दिनांकापासून किंवा धंदा एखाद्या कॅलेंडर महिन्यात बंद केला असेल तर अशा महिन्याच्या अशा भागापासून १० दिवसांत शहराच्या हद्दीतील संबंधित विभागातील स्थानिक संस्था प्राधिकाऱ्याकडे नमुना ड-१ मध्ये विवरणपत्र सादर करेल.

३०. **विवक्षित प्रकरणामध्ये व्यापाऱ्यांनी द्यावयाची प्रतिभूती.**—(१) नोंदणी प्रमाणपत्र अंमलात असताना जर एखादा नोंदणीकृत व्यापारी या नियमांच्या तरतुदीद्वारे किंवा त्या अन्वये त्याने भरणा करणे आवश्यक असलेला स्थानिक संस्था कर भरण्यात तीन किंवा अधिक वेळा कसूर करील तर, व्यापाऱ्याकडून येणे असलेला स्थानिक संस्था कर, व्याज किंवा शास्ती यांची योग्य वसुली होण्यासाठी तसे करणे आवश्यक आहे असे आयुक्ताला योग्य वाटल्यास त्याला असे प्रमाणपत्र अंमलात असताना कोणत्याही वेळी लेखी आदेश काढून आणि त्यामध्ये नमूद करण्यात आलेल्या कारणासाठी व्यापाऱ्याला वेळोवेळी आदेशामध्ये विनिर्दिष्ट करण्यात येईल अशा कालावधीत आणि त्यात नमूद करण्यात येईल अशी प्रतिभूती भरण्यास फर्मावण्यात येईल, किंवा जर त्या व्यापाऱ्याने या पोट नियमाखालील आदेशानुसार यापूर्वीच कोणतीही प्रतिभूती भरली असेल तर आदेशामध्ये विनिर्दिष्ट करण्यात येईल अशी अतिरिक्त प्रतिभूती उपरोक्त प्रयोजनासाठी भरण्यास फर्मावता येईल.

(२) कोणत्याही व्यापाऱ्याला आपली बाजू मांडण्याची वाजवी संधी देण्यात आल्याखेरीज पोट-नियम (१) खालील कोणतीही प्रतिभूती किंवा, यथास्थिती, अतिरिक्त प्रतिभूती भरण्यास फर्मावता येणार नाही.

(३) एखाद्या व्यापाऱ्याला पोट-नियम (१) अन्वये भरण्यास फर्मावण्यात येणारी कोणतीही प्रतिभूती ही, अशी प्रतिभूती किंवा यथास्थिति, अतिरिक्त प्रतिभूती ज्यावर्षी भरण्यास फर्मावण्यात आली असेल त्या वर्षातील आयुक्ताच्या अंदाजानुसार या नियमान्वये आकारणी योग्य असलेल्या स्थानिक संस्था कराच्या रकमेपेक्षा अधिक असणार नाही.

(४) आयुक्ताला आदेशाद्वारे आणि योग्य व पुरेसा कारणासाठी व्यापाऱ्याने दिलेली प्रतिभूती किंवा, यथास्थिती, अतिरिक्त प्रतिभूती संपूर्णतः किंवा तिचा कोणताही भाग व्यापाऱ्याकडून देय असलेल्या अशा आदेशामध्ये त्यासाठी विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या कालावधीनंतर अशा राहिलेल्या स्थानिक संस्था कराच्या व्याजाच्या किंवा शास्तीच्या कोणत्याही रकमेच्या वसुलीसाठी जप्त करता येईल :

परंतु, अशा व्यापाऱ्याला आपली बाजू मांडण्याची वाजवी संधी दिल्याखेरीज कोणताही आदेश काढण्यात येणार नाही.

(५) पोट-नियम (४) अन्वये, काढण्यात आलेल्या आदेशामुळे कोणत्याही व्यापाऱ्याने भरलेली प्रतिभूती अपुरी असल्याच्या बाबतीत, अशा तफावतीबाबत आयुक्तांकडून एका आदेशाद्वारे निर्देशित करण्यात येईल अशा रीतीने व अशा वेळेत भरून काढील.

(६) व्यापाऱ्याने प्रतिभूती म्हणून किंवा, यथास्थिती, अतिरिक्त प्रतिभूती म्हणून या नियमान्वये ठेवलेली रक्कम या तरतुदींच्या प्रयोजनासाठी आवश्यक नसेल तर त्या व्यापाऱ्याने अर्ज केला असता आयुक्त अशी कोणतीही रक्कम किंवा तिचा भाग यांचा परतावा करण्याचा आदेश देऊ शकेल.

३१. **विवाद्य प्रश्नांचा निर्णय करणे.**—(१) नियम ३३ किंवा ३४ खाली न्यायालयाने किंवा आयुक्ताने व्यापाऱ्याचे किंवा व्यक्तीचे निर्धारण किंवा पुनर्निर्धारण सुरू करण्यापूर्वी कार्यवाही व्यतिरिक्त अन्यथा, या नियमांच्या प्रयोजनासाठी, विवक्षित मालाच्या शहरात करावयाच्या कोणत्याही आयातीच्या बाबतीत कोणताही स्थानिक संस्था कर देय आहे किंवा कसे किंवा स्थानिक संस्था कर देय असेल तर, त्याचा दर किती याबाबत कोणताही प्रश्न उद्भवल्यास, आयुक्त, या बाबतीत व्यापाऱ्याने किंवा व्यक्तीने त्यांच्याकडे अर्ज केल्यावर अशा प्रश्नांचा निर्णय करणारा आदेश काढील.

**स्पष्टीकरण.**—(१) उक्त नियमांपैकी कोणत्याही नियमाखाली आयुक्ताने व्यापाऱ्यावर कोणतीही नोटीस बजावली असेल तेव्हा, नियम ३३ किंवा ३४ खाली आयुक्ताने व्यापाऱ्याचे निर्धारण किंवा पुनर्निर्धारण सुरू केले आहे असे मानले जाईल.

(२) निर्णयापूर्वी, उपभोग, उपयोग यासाठी किंवा शहरामध्ये वापर करण्यासाठी किंवा विक्री करण्यासाठी कोणत्याही बाबतीत शहरात आयात केलेल्या कोणत्याही मालासंबंधात कोणत्याही व्यक्तीचे या नियमाखालील दायित्व अशा निर्णयामुळे बाधित होणार नाही असा निदेश आयुक्त देऊ शकेल.

(३) या अधिनियमाखालील आणि या नियमांखाली व पूर्वोक्त काढलेल्या कोणत्याही आदेशावरून कोणताही प्रश्न उद्‌भवल्यास या नियमाखाली त्याचा निर्णय होण्यासाठी असा कोणताही प्रश्न विचारार्थ स्वीकारण्यात येणार नाही.

**३२. निर्यातीच्या बाबतीत स्थानिक संस्था कराचा परतावा.**—विक्री करारानुसार असेल त्या व्यतिरिक्त अन्य प्रकारे कोणत्याही मालाची निर्यात करणारी व्यक्ती शहरामध्ये आयात करण्यात आलेला आणि ज्याच्या आयातीवर यथोचित स्थानिक संस्था कर भरण्यात आलेला असेल असा माल शहराबाहेर निर्यात करील किंवा त्या व्यक्तीने अशा मालाची विक्री केलेली असल्यास आणि त्या व्यक्तीने पुढील शर्ती पूर्ण केल्यास अशारितीने भरण्यात आलेल्या स्थानिक संस्था करापैकी नव्वद टक्के रक्कम त्या व्यक्तीला नमुना द्यावयाची ड मधील आदेशाद्वारे परत करण्यात येईल, त्याच्या शर्ती पुढीलप्रमाणे :—

(क) आयात केलेला माल निर्यातीसाठी आयात केलेला आहे हे दर्शवून त्याचा तपशील संबंधित विवरणामध्ये दिला पाहिजे आणि ते विवरणपत्र दाखल केले पाहिजे.

(ख) आयातीतील स्थानिक संस्था कर संबंधित विवरणाबरोबर भरला पाहिजे.

(ग) माल आयात केल्यापासून सहा महिन्यांच्या कालावधीत त्याची शहराबाहेर निर्यात केली पाहिजे.

(घ) त्या व्यक्तीने निर्यातीनंतर संबंधित विवरण दाखल करून परताव्याची मागणी केली पाहिजे.

(ङ) त्या व्यक्तीला सांगण्यात येईल तेव्हा तिने आयात करण्यात आलेला माल विनिर्दिष्ट कालावधीत आणि मालामध्ये कोणताही बदल न करता निर्यात करण्यात आलेला आहे अशी आयुक्ताची खात्री पटेल अशाप्रकारे सिद्ध केले पाहिजे: परंतु पुढे असे की, अशा कोणत्याही व्यापाऱ्यास, जो अनुसूची "क" मध्ये नमूद केलेल्या मालाची आयात व निर्यात नियमितरित्या करीत असेल, अशा व्यापाऱ्याकडून आयात केलेला माल विहित केलेल्या कालावधीत निर्यात करावयाचा आहे असे हमीपत्र घेतल्यावर आयुक्त, त्याला देय असलेल्या स्थानिक संस्था कराच्या केवळ १० टक्के रक्कम भरण्याची परवानगी देऊ शकेल.

**३३. स्थानिक संस्था कराचे निर्धारण.**—(१) स्थानिक संस्था कराची रक्कम देण्यास पात्र असलेल्या नोंदणीकृत व्यापाऱ्याकडून देय असलेल्या रकमेचे, प्रत्येक कालावधीसाठी वेगवेगळे निर्धारण करण्यात येईल.

(२) कोणत्याही कालावधीच्या बाबतीत नोंदणीकृत व्यापाऱ्याने दिलेली विवरणपत्रे अचूक व पूर्ण आहेत, अशी आयुक्ताची खात्री झाल्यास, तो विवरणपत्राच्या आधारे त्या व्यापाऱ्याकडून देय असलेल्या स्थानिक संस्था कराची रक्कम निर्धारित करील.

(३) आयुक्त, नोंदणीकृत व्यापारी जो,

(एक) कोणत्याही कालावधीकरिता विवरणपत्र सादर करण्यास कसूर करील, किंवा

(दोन) एखाद्या कालावधी संबंधातील शेवटचे विवरणपत्र सादर करण्यासाठी विहित केलेल्या दिनांकास किंवा त्यापूर्वी त्या सर्व कालावधीच्या बाबतीतील सर्व विवरणपत्रे सादर केली असतील आणि त्या कालावधीच्या बाबतीत त्या नोंदणीकृत व्यापाऱ्याने दिलेली विवरणपत्रे अचूक व पूर्ण आहेत या बाबतीत त्याची खात्री झालेली नसेल आणि व्यापाऱ्याने स्वतः त्या ठिकाणी उपस्थित राहणे किंवा त्याने याबाबतचा पुरावा सादर करणे आवश्यक आहे असे वाटत असेल तर, किंवा,

(तीन) कोणत्याही कालावधीच्या संबंधात विवरणपत्र सादर केल्यावर व सादर केलेल्या विवरणपत्रात रकमेचा परतावा मागत असेल किंवा,

(चार) नोंदणीचे प्रमाणपत्र रद्द करण्यासाठी जो अर्ज सादर करील, त्यांचे निर्धारण करील.

(४) आयुक्त, व्यापारी किंवा व्यक्तीचे जो,

(एक) स्थानिक संस्था कराची रक्कम भरण्यास पात्र असेल, परंतु नोंदणीसाठी अर्ज करण्यात कसूर करील किंवा नियमान्वये त्याकरिता विहित केलेल्या कालावधीत नोंदणीसाठी अर्ज करण्यात कसूर करील, किंवा,

(दोन) नमुना छ मध्ये विवरणपत्र सादर करण्यासाठी आदेशान्वये निदेश दिलेले होते.

त्यांचे निर्धारण करील.

(५) या नियमाच्या उप-नियम (३) व (४) अन्वये दिलेल्या कोणत्याही नोटिशीतील अटींचे पालन करण्यास नोंदणीकृत व्यापाऱ्याने कसूर केल्यास, आयुक्त त्या व्यापाऱ्याकडून देय असलेल्या स्थानिक संस्था कराची रक्कम त्याच्या योग्य निर्णय शक्तीनुसार निर्धारित करील.

(६) या नियमाच्या पूर्ववर्ती तरतुदींमध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, व्यापाऱ्याच्या लेख्यांच्या अचुकतेबद्दल आणि पूर्णतेविषयी आयुक्ताची खात्री झाली नसेल तर आयुक्त, व्यापाऱ्याला आपली बाजू मांडण्याची योग्य संधी दिल्यानंतर, त्याच्याकडून देय असलेली स्थानिक संस्था कराची रक्कम, कोणतीही असल्यास, त्याच्या योग्य निर्णय शक्तीनुसार निर्धारित करील.

(७) या नियमाच्या उप-नियम (३), (४), (५) व (६) यांच्या प्रयोजनार्थ, आयुक्त, व्यापाऱ्याला नमुना ज मध्ये नोटीस देऊन व नोटिशीच्या अनुपालनाकरिता असलेला दिनांक नोटीस बजावण्याच्या दिनांकापासून पंधरा दिवसांपेक्षा आधीचा नसेल हे निश्चित करून त्याद्वारे, अशा संबंधित निर्धारणाच्या वर्षाच्या अंतिमपासून पाच वर्षांच्या आत व्यापाऱ्याचे निर्धारण करण्याची कार्यवाही करील.

(८) या नियमान्वये केलेले कोणतेही मूल्यनिर्धारण कोणताही दंड किंवा व्याज किंवा या अधिनियमाखालील अपराधाबद्दलचा खटला यांना बाधा न येता केलेले असेल.

(९) मूल्य निर्धारणाचा आदेश नमुना झ मध्ये असेल.

(१०) स्थानिक संस्था कर नियमांच्या नियम ४५ अन्वये दंड किंवा व्याज लावणारा आदेश किंवा दंड किंवा व्याज किंवा दोन्हीसह किंवा दोन्हीशिवाय असलेला जप्तीचा आदेश या नियमान्वये या कालावधीच्या संबंधात काढलेल्या मूल्यनिर्धारणाच्या आदेशामध्ये समाविष्ट करण्यात येईल.

(११) या नियमाच्या नमुना "ज" मध्ये काढलेल्या मागणीच्या नोटिशीसह निर्धारणाच्या आदेशाची एक प्रमाणित प्रत निर्धारितीला निःशुल्क पुरविण्यात येईल.

(१२) ज्या निर्धारितीला निर्धारणाच्या आदेशाची जादा प्रत किंवा प्रतींची आवश्यकता असेल त्याने याबाबत अर्ज केल्यावर प्रत्येक निर्धारणाच्या आदेशाच्या प्रत्येक प्रतिलिपीचा आकार रुपये २५/- भरल्यावर त्याला पुरविण्यात येईल.

(१३) एखाद्या व्यापाऱ्याच्या संबंधातील करावयाच्या मूल्य निर्धारणाशी संबंधित कागदपत्रे एकत्र ठेवण्यात येतील व मूल्यनिर्धारण प्रकरणाचा तो अभिलेख होईल.

(१४) मूल्य निर्धारण प्रकरणाचे अभिलेख ज्या कालावधीच्या संबंधातील ते मूल्यनिर्धारण असेल त्या कालावधीच्या लगतपुढील दहा वर्षांच्या कालावधीसाठी किंवा उक्त कालावधीच्या संबंधातील या अधिनियमाखालील अंतिम कार्यवाही पूर्ण झाल्याच्या लगत पुढील तीन वर्षांच्या कालावधीसाठी यापैकी जो कालावधी नंतरचा असेल त्या कालावधीपर्यंत जतन करण्यात येईल.

३४. **पुनःमूल्यनिर्धारण.**— (१) कोणत्याही कालावधीसाठी किंवा त्याच्या भागासाठी एखाद्या व्यापाऱ्याच्या बाबतीत किंवा व्यक्तीच्या बाबतीत नियम ३३ अन्वये मूल्यनिर्धारण केल्यानंतर आणि कोणत्याही कारणासाठी शहरात आयात केलेल्या कोणत्याही मालाच्या संबंधात देय असलेल्या स्थानिक संस्था कराचे मूल्यनिर्धारण झाले नसेल, किंवा अल्प मूल्यनिर्धारण झाले असेल, किंवा मूल्यनिर्धारण कमी दराने केले गेले असेल, किंवा कोणतीही चुकीची वजाती केली गेली असेल किंवा मागणी चुकीने मान्य केली असेल किंवा त्याच्या संबंधात चुकीने परतावा देण्यात आला असेल त्या बाबतीत, आयुक्ताकडे अभिलेखात कागदोपत्री पुरावा असल्यास, आयुक्त असा मूल्यनिर्धारण आदेश व्यापाऱ्यावर किंवा व्यक्तिवर बजावण्यात आलेल्या दिनांकापासून तीन वर्षांच्या आत कोणत्याही वेळी त्या व्यापाऱ्याकडून किंवा व्यक्तीकडून देय असलेल्या स्थानिक संस्था कराच्या रकमेचे, त्याच्या योग्य निर्णयशक्तीनुसार व यासंबंधीची कारणे नमूद करून मूल्यनिर्धारण किंवा पुनःमूल्यनिर्धारण करण्यासाठी स्वयंस्पष्ट आदेश पारित करून नमुना ट मध्ये नोटीस काढून कार्यवाही करील.

परंतु चुकवेगिरीमुळे कोणतेही न्यून मूल्यनिर्धारण झाले नसते तर ज्या दराने मूल्यनिर्धारण करण्यात आले असते त्या दराने परंतु या नियमाद्वारे किंवा त्या अन्वये वेळोवेळी अनुज्ञेय असतील अशा कोणत्याही असल्यास, यथोचित वजाती केल्यानंतर स्थानिक संस्था कराच्या रकमेचे निर्धारण करण्यात येईल.

(२) पोट नियम (१) मधील कोणतीही गोष्ट, नियम ४९ अन्वये देण्यात आलेल्या कोणत्याही नोटिशीच्या कोणत्याही कार्यवाहीस लागू होणार नाही.

(३) नियम ५२ मधील कोणतीही गोष्ट या नियमाखालील कार्यवाहीस बाधक होणार नाही.

३५. **चुकांची दुरुस्ती.**—(१) आयुक्ताला, त्याने कोणताही आदेश काढल्याच्या दिनांकापासून तीन वर्षांच्या आत कोणत्याही वेळी स्वतः होऊन अभिलेखातील कोणतीही उघड होणारी चूक दुरुस्त करता येईल आणि त्याच कालावधीत, अशा आदेशामुळे बाधा पोचलेल्या कोणत्याही व्यक्तीने त्याच्या निदर्शनास आणून दिलेली कोणतीही चूक दुरुस्त करता येईल. परंतु, दुरुस्तीच्या परिणामी स्थानिक संस्थाकरात वाढ होणार असेल किंवा परताव्याची रक्कम कमी होणार असेल तर आयुक्ताला अशा व्यक्तीला, तसे करण्यासंबंधातील त्या हेतूबाबत नमुना त मध्ये नोटीस दिलेली नसेल आणि तिचे म्हणणे ऐकून घेण्याची वाजवी संधी दिलेली नसेल, तर अशी कोणतीही दुरुस्ती करता येणार नाही.

(२) अशा कोणत्याही दुरुस्तीच्या परिणामी स्थानिक संस्था कर किंवा शास्ती किंवा व्याज किंवा जप्तीची रक्कम कमी होणार असेल त्याबाबतीत आयुक्त अशा व्यक्तीला देय असलेली कोणतीही रक्कम परत करील.

(३) अशा कोणत्याही दुरुस्तीच्या परिणामी स्थानिक संस्था कर किंवा शास्ती किंवा व्याज किंवा जप्तीची रक्कम यात वाढ होणार असेल किंवा परताव्याच्या रकमेत घट होणार असेल त्या बाबतीत आणि वरील कोणतीही रक्कम,नोटिशीत विनिर्दिष्ट केलेल्या दिनांकानंतर ज्याही कालासाठी किंवा प्रदानाच्या वाढीव दिनांकानंतरही भरण्यात आली नसेल तर मालमत्ता कराची थकबाकी म्हणून ती वसुली योग्य असेल.

३६. **अपिले.**—(१) अधिनियमाच्या कलम ४०६, पोट-कलम (६) खाली दाखल करण्यात आलेले अपील हे,—

(क) या नियमांना जोडलेल्या नमुना थ मध्ये असेल.

(ख) अपिलकर्त्याचे नाव व पत्ता विनिर्दिष्ट करणारे असेल.

(ग) ज्या आदेशाविरुद्ध ते करण्यात आले असेल त्याचा दिनांक विनिर्दिष्ट करणारे असेल.

(घ) त्यात वस्तुस्थितीच्या स्पष्ट निवेदनाचा समावेश असेल.

(ङ) त्यासाठी सहाय्य मिळण्याची प्रार्थना करण्यात आली असेल ते नेमकेपणाने व थोडक्यात मांडलेले असेल, आणि

(च) अधिनियमाच्या कलम ४०६, पोट- कलम (१), खंड (ङ) अन्वये आवश्यक केलेल्या स्थानिक संस्था कराच्या जमा केलेल्या विवाद्य रकमेचा पुरावा असलेले चलन सोबत जोडलेले असेल.

(छ) हव्या असलेल्या सहायतेचे प्रमाण नमूद केलेले असेल,

(ज) ते, अपिलकर्त्याद्वारे किंवा याबाबतीत त्याने पुढील नमुन्यात यथोचितरित्या लेखी प्राधिकृत केलेल्या अभिकर्त्याद्वारे स्वाक्षरित केलेले व सत्यापित केलेले असेल :—

"मी ............................... वरील अपील अर्जामध्ये नाव असलेल्या अपीलकर्त्याने नियुक्त केलेला अभिकर्ता, याद्वारे असे जाहिर करतो की, यात जे नमूद केले आहे ते माझ्या संपूर्ण माहिती व विश्वासानुसार सत्य आहे."

(२) अपिलीय प्राधिकरणाची खात्री पटण्याकरीता अपील अर्जासोबत, अपील सादर करतेवेळी असा आदेश किंवा त्याची प्रत सादर न करण्याविषयी स्पष्ट करण्यात आल्याखेरीज व्यापाऱ्याला पुरविण्यात आलेल्या आदेशाची प्रमाणित प्रत किंवा त्याची यथोचितरित्या अभिप्रमाणित केलेली प्रत सोबत जोडावी लागेल.

(३) अपील अर्ज हा, अपीलकर्त्याद्वारे किंवा त्याच्या अभिकर्त्याद्वारे अपिलीय प्राधिकरणास सादर करण्यात येईल किंवा नोंदणीकृत डाकेने उक्त प्राधिकरणाकडे पाठविण्यात येईल.

३७. **सुनावणी.**—(१) (क) जर अपिलीय प्राधिकाऱ्याने संक्षेपत: अपील नाकारले नसेल तर, अपिलाच्या सुनावणीसाठी एक दिनांक निश्चित करण्यात येईल. अशारितीने निश्चित केलेला दिनांक, अपिलकर्त्यास किंवा त्याच्या अभिकर्त्यास त्याची माहिती ज्या दिनांकास दिलेली असेल त्या दिनांकापासून दहा दिवसांपेक्षा आधीचा असणार नाही. परंतु, सुनावणीसाठी जर अपिलकर्ता किंवा त्याचा अभिकर्ता यांना यासाठी लेखी संमती दिली तर, उपरोक्त दिनांकाच्या आधीचा दिनांक निश्चित करता येईल.

(२) सुनावणीसाठी जर दिनांक व वेळ निश्चित केलेली असेल किंवा सुनावणी स्थगित करण्यात येईल असा इतर कोणत्याही दिनांकास किंवा इतर कोणत्याही वेळी, अपिलकर्ता, उक्त प्राधिकाऱ्यासमोर एकतर व्यक्तिश: किंवा त्याच्या अभिकर्त्यामार्फत उपस्थित राहणार नाही, तेव्हा अशा प्राधिकाऱ्यास, त्यास योग्य वाटेल त्याप्रमाणे, अपील खारीज करता येईल किंवा एकतर्फी निर्णय देता येईल.

परंतु या नियमान्वये, जर अपील ज्या दिनांकास खारीज केले असेल किंवा एकतर्फी निर्णय दिलेला असेल त्या दिनांकापासून तीस दिवसाच्या आत, अपीलकर्त्यास आदेश रद्द करण्यासाठी अपील प्राधिकाऱ्याकडे अर्ज करता येईल आणि त्याच्यावर सुनावणीच्या दिनांकाची माहिती यथोचितरित्या बजावलेली नव्हती किंवा सुनावणीसाठी जेव्हा अपील पुकारले गेले होते तेव्हा उपस्थित राहण्यापासून त्यास पुरेशा कारणाने प्रतिबंध केलेला होता अशी त्याची खात्री पटली तर उक्त प्राधिकाऱ्यास, त्यास योग्य वाटेल अशा अटींवर खारीज केल्याचा निर्णय किंवा एकतर्फी निर्णय रद्द करण्याचा आदेश देता येईल आणि अपिलाच्या कामकाजासाठी एक दिवस नेमून देता येईल.

(३) (क) प्रत्येक अपील प्राधिकरण नोंदवह्या ठेवील या नोंदवह्यांमध्ये अपिले दाखल केल्याच्या कालक्रमानुसारच्या क्रमाचा तपशील आणि मिळावयाच्या सहाय्याचे प्रमाणदेखील दर्शविलेले असेल.

(ख) या नियमांच्या प्रयोजनासाठी, "मिळावयाच्या सहाय्याचे प्रमाण" या शब्दप्रयोगाचा अर्थ,

(एक) स्थानिक संस्था कराची किंवा शास्तीची किंवा व्याजाची, जर कोणतेही असल्यास, सरासरी रक्कम किंवा जप्त केलेली रक्कम किंवा मागणी केलेली रक्कम आणि अपीलकर्त्याने परतावायोग्य म्हणून दावा केलेली रक्कम, किंवा

(दोन) अपीलकर्त्याने दावा केलेली परताव्याची रक्कम आणि ज्याच्या विरोधात अपील दाखल केलेले आहे त्याबाबतच्या आदेशामध्ये मंजूर केलेला परतावा यांतील फरकाची रक्कम, किंवा

(तीन) स्थानिक संस्था कर किंवा व्याज, कोणतेही असल्यास, किंवा जप्त, मागणी केलेली रक्कम आणि देय असलेली अपीलकर्त्याने स्वीकारलेली रक्कम यातील फरकाची रक्कम.

३८. **अपीलकर्त्याला आणि संबंधित अधिकाऱ्याला आदेशाची प्रत देणे.**—अपिलामध्ये मंजूर केलेली कोणत्याही आदेशाची प्रमाणित प्रत अपीलकर्त्याला किंवा संबंधित व्यक्तीला विनामूल्य पुरविण्यात येईल आणि दुसरी प्रत ज्या अधिकाऱ्याच्या आदेशानुसार अपील दाखल करण्यात आले आहे त्या अधिकाऱ्याकडे पाठविण्यात येईल.

३९. **स्थानिक संस्था कराचे पूर्णांकात रुपांतर करणे.**—स्थानिक संस्था कर, शास्ती, व्याज, आपसमेळ रक्कम, जप्त केलेली रक्कम, देय किंवा देय असलेली इतर कोणतीही रक्कम आणि या नियमांच्या तरतुदींअन्वये देय असलेली परताव्याची रक्कम, लगतच्या रुपयामध्ये पूर्णांकात रुपांतरित करण्यात येईल, आणि त्यासाठी जर अशी रक्कम रुपयाचा भाग असलेल्या पैशामध्ये असेल तर, पन्नास पैसे किंवा त्यापेक्षा अधिक असल्यास एक रुपयात, आणि तो भाग पन्नास पैशांपेक्षा कमी असल्यास, दुर्लक्षित करण्यात येईल.

४०. **स्थानिक संस्था कर भरणे.**—(१) या नियमान्वये, आयुक्तांनी लादलेला स्थानिक संस्था कर, किंवा शास्ती किंवा व्याज अथवा जप्त करण्यात आलेली कोणतीही रक्कम किंवा कोणतीही असल्यास, दंडाची रक्कम भरण्यास पात्र असलेला प्रत्येक नोंदणीकृत व्यापारी, नोंदणी न झालेला व्यापारी आणि व्यापाऱ्याव्यतिरिक्त प्रत्येक व्यक्ती :—

(क) ज्या महिन्याशी संबंधीत देय आणि प्रदेय रक्कम प्रदान करावयाची असेल त्या पुढील महिन्याच्या १० तारखेला किंवा त्यापूर्वी

(ख) आयुक्ताकडून निदेश देण्यात येईल अशा रीतीने अशा तारखांना आणि अशा प्रसंगी व अशा प्राधिकरणाकडे आणि आयुक्ताकडून आदेशाद्वारे व्यापाऱ्यांच्या वेगवेगळ्या वर्गासाठी व व्यक्तींच्या वेगवेगळ्या वर्गासाठी विनिर्दिष्ट करण्यात येतील अशा वेगवेगळ्या रीतीने तारखांना, कालांतरांनी, प्रसंगी आणि प्राधिकरणाकडे स्थानिक संस्था कर, शास्ती, व्याज व जप्त केलेली रक्कम भरतील किंवा दंडाची रक्कम भरतील.

(२) या नियमातील पोट नियम (१) च्या खंड (क) मध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, परंतु या नियमातील तरतुदींच्या अधीन राहून ज्या नोंदणीकृत व्यापाऱ्यास नियम २९ च्या पोट नियम (२) च्या खंड (ख) नुसार वर्षाच्या पहिल्या सहामाहीसाठी नमुना ड-१ मध्ये सहामाही विवरणपत्र व नमुना ड-२ मध्ये वार्षिक विवरणपत्र सादर करणे आवश्यक आहे, त्या व्यापाऱ्यानी संबंधीत वर्षातील प्रत्येक महिन्याची स्थानिक संस्था कराची रक्कम पुढील महिन्याच्या दहा तारखेला किंवा त्यापूर्वी भरणे आवश्यक राहील.

(३) कोणतीही स्थानिक संस्था कर, शास्ती, व्याज, जप्त केलेली रक्कम किंवा दंड जो, त्याच्या प्रदानासाठी या नियमान्वये आयुक्तानं काढलेल्या आदेशात उल्लेखिलेल्या वेळेनंतर अदत्त राहिलेला आहे तो, नमुना "ठ" मधील नोटीस बजावून मालमत्ता कराची थकबाकी असल्याप्रमाणे वसूलीयोग्य असेल.

४१. **विवक्षित वसुलीची कार्यवाही पुढे चालू ठेवणे .**— (१) ज्या बाबतीत कोणताही स्थानिक संस्था कर, शास्ती, व्याज, जप्त केलेली रक्कम किंवा दंडाची रक्कम (यात यापुढे या नियमात ज्याचा निर्देश "महापालिका देय रक्कमा" असा करण्यात आला आहे) यासाठी पात्र व्यापाऱ्यावर किंवा व्यक्तीवर मागणी नोटीस बजावण्यात आली आहे आणि अशा महापालिका देय रकमाच्या संबंधात कोणतेही अपील किंवा इतर कार्यवाही दाखल करण्यात आली आहे किंवा करण्यात आली असल्यास,

(क) अशा अपिलात किंवा कार्यवाहीत अशा महापालिका देय रकमांमध्ये वाढ करण्यात आली असेल तर, आयुक्त, अशा व्यापाऱ्यावर किंवा यथास्थिती, व्यक्तींवर केवळ वाढविण्यात आलेल्या अशा महापालिका देय रकमाच्या संबंधात दुसरी नोटीस बजावतील :—

(ख) अशा अपिलात किंवा कार्यवाहीमध्ये अशा महापालिकेच्या देय रकमा कमी करण्यात आल्या असतील तर, आयुक्त, त्यास अशा प्रकारे रक्कम कमी केली असल्याच्या वस्तुस्थितीची माहिती देईल :—

(ग) अशा अपिलात किंवा कार्यवाहीमध्ये कमी करण्यात आलेल्या महापालिका देय रकमा आणि त्याचा कोणताही परतावा मिळण्यास व्यापारी किंवा व्यक्ती हक्कदार असेल तर, नियम ४४ च्या तरतुदीनुसार असा परतावा करण्यात येईल.

४२. **वसुलीची विशेष पद्धती.**— (१) त्या त्या वेळी अंमलात असलेल्या कोणत्याही कायद्यात काहीही अंतर्भूत असले तरी किंवा त्याविरुद्ध करार करण्यात आला असला तरी, आयुक्तास, कोणत्याही वेळी किंवा वेळोवेळी लेखी नोटिशीद्वारे, स्थानिक संस्था कर भरण्यास जबाबदार असलेल्या व्यापाऱ्याला किंवा व्यक्तीला आयुक्तास माहित असलेल्या त्याच्या शेवटच्या पत्त्यावर त्याची एक प्रत सादर करण्यात येईल आणि पुढील गोष्टी करण्यास भाग पाडील :—

(क) जिच्याकडून कोणतीही रक्कम देय असेल किंवा देय होणार असेल अशी कोणतीही व्यक्ती, या नियमान्वये, कोणतीही रक्कम देय झालेली अशा व्यापाऱ्यास किंवा व्यक्तीस आणि भरावयाचे राहून गेली असेल, किंवा

(ख) कोणतीही व्यक्ती, जी असा व्यापारी किंवा व्यक्ती यांच्याकरिता किंवा त्याच्या वतीने आयुक्तास प्रदान करण्यासाठी रक्कम बाळगत असेल किंवा त्यानंतर बाळगणार असेल तर, रक्कम देय झाल्यानंतर किंवा नोटिशीमध्ये विहित केलेल्या मुदतीला किंवा मुदतीमध्ये ( परंतु रक्कम देय होण्यापूर्वी नव्हे किंवा उपरोक्त प्रमाणे रक्कम बाळगत असल्यास ) अशा व्यापाऱ्याकडून किंवा व्यक्तीकडून त्या रकमेतून स्थानिक संस्था कर, शास्ती, व्याज, जप्त केलेली रक्कम, देय रकमेएवढी किंवा कमी असल्यास संपूर्ण रक्कम भरण्यास फर्मावू शकेल.

**स्पष्टीकरण.**—या नियमांच्या प्रयोजनासाठी एखाद्या व्यापाऱ्याकडून किंवा व्यक्तीकडून येणे असलेली किंवा त्यांच्याकरिता किंवा त्याच्या वतीने एखाद्या व्यक्तीने बाळगलेली रक्कम किंवा पैसे याचा हिशेब कायद्याने प्रस्थापित झालेले असे मागणी हक्क की जे अशा व्यक्तीकडून किंवा व्यापाऱ्याकडून त्या व्यक्तीस देय झालेले असतील ते त्या रकमेतून वजा केल्यानंतर करण्यात येईल

(२) आयुक्तास, कोणत्याही वेळी किंवा वेळोवेळी कोणतीही अशी नोटीस सुधारित किंवा रद्द करता येईल, किंवा दिलेल्या नोटिशीच्या अनुसार करावयाच्या प्रदानाची मुदत वाढविता येईल.

(३) या नियमान्वये देण्यात आलेल्या नोटिशीचे अनुपालन म्हणून एखाद्या व्यक्तीने कोणतेही प्रदान केले असल्यास ते प्रदान त्या व्यक्तीने अशा व्यापाऱ्यांच्या किंवा व्यक्तीच्या प्राधिकारान्वये केले असल्याचे समजण्यात येईल आणि आयुक्ताची पावती ही प्रथम उल्लेख केलेल्या व्यक्तीने पावतीमध्ये नमूद केलेल्या रकमेच्या मर्यादेपर्यंत आपली जबाबदारी योग्य आणि पर्याप्तपणे पार पाडल्याचे समजण्यात येईल.

(४) या नियमात उल्लेख केलेली नोटीस मिळाल्यानंतर असा व्यापारी किंवा अशी व्यक्ती याबाबत दायित्व पार पाडणारी कोणतीही व्यक्ती पार पाडलेल्या दायित्वाच्या किंवा अशा व्यापाऱ्याच्या किंवा व्यक्तीच्या थकबाकीबाबत जी कमी असेल त्या मर्यादेपर्यंत आयुक्तास व्यक्तिशः उत्तरदायी असेल.

(५) या नियमान्वये एखाद्या व्यक्तीला नोटीस पाठविण्यात आली असेल अशी व्यक्ती आपल्याकडे किंवा अशा व्यापाऱ्याकडे प्रदान करण्यात आलेली रक्कम किंवा तिचा कोणताही भाग येणे नाही किंवा ती कोणत्याही व्यक्तींकरिता किंवा तिच्या वतीने कोणतीही रक्कम बाळगत नाही असे आयुक्ताचे समाधान करू शकला तर या नियमात काहीही अंतर्भूत असेल तरी अशा व्यक्तीला अशा प्रकारे कोणतीही रक्कम किंवा तिचा भाग आयुक्ताकडे प्रदान करणे आवश्यक असल्याचे मानले जाणार नाही.

(६) एखाद्या व्यक्तीने आयुक्तास प्रदान करणे आवश्यक असलेली कोणतीही रक्कम किंवा या नियमाअन्वये ज्याकरिता तो व्यक्तिशः आयुक्तास प्रदान करण्यास जबाबदार असणारी कोणतीही रक्कम भरावयाचे राहून गेल्यास, ती रक्कम मालमत्ता करांची थकबाकी म्हणून वसूल करण्याजोगी असेल

४३. **महसूल रक्षणासाठी तात्पुरती जप्ती आणणे.**—(१) निर्धारण किंवा पुनर्निर्धारण किंवा स्थानिक संस्था कराची वसुली किंवा या नियमान्वये एखाद्या व्यक्तीकडून किंवा व्यापाऱ्याकडून इतर कोणत्याही रकमेची वसुली याबाबतच्या कार्यवाहीच्या चौकशीच्या कालावधीमध्ये किंवा तपासणी चालू असताना किंवा एखाद्या व्यक्तीच्या किंवा व्यापाऱ्याच्या कामधंद्याबाबत या नियमान्वये शोध घेणे चालू असताना महसुलाचे रक्षण करण्याच्या प्रयोजनार्थ तसे करणे आवश्यक आहे याबद्दल आयुक्तांचे मत झाल्यास तो, त्यावेळी अंमलात असलेल्या कोणत्याही कायद्यात किंवा त्याविरुद्ध कोणत्याही करारात काहीही अंतर्भूत असेल तरी व्यक्तीला किंवा व्यापाऱ्याला आपली बाजू मांडण्याची उचित संधी दिल्यानंतर लेखी नोटीस देऊन ज्याच्याबाबत अशी कार्यवाही चालू आहे किंवा ज्याच्या धंद्याच्या बाबतीत तपासणी किंवा शोध घेण्याचे काम हाती घेण्यात आले आहे, त्या व्यक्तीच्या किंवा व्यापाऱ्याच्या मालकीची संपत्ती तात्पुरती जप्त करू शकेल. आणि देय असलेली कोणतीही रक्कम किंवा इतर व्यक्तीकडून त्या व्यक्तीला किंवा व्यापाऱ्याला देय होणारी कोणतीही रक्कम किंवा अशा व्यक्तीच्या किंवा व्यापाऱ्यांच्या वतीने एखादी व्यक्ती बाळगत असलेली किंवा बाळगणार असलेली कोणतीही रक्कम, तशी लेखी नोटीस देऊन तात्पुरती जप्त करू शकेल.

(२) पोट-नियम (१) अन्वये काढण्यात आलेल्या नोटिशीच्या दिनांकापासून सहा महिन्यांचा कालावधी संपल्यानंतर अशी प्रत्येक तात्पुरती जप्ती लागू असण्याचे बंद होईल :

परंतु, आयुक्तास, कारणांची लेखी नोंद करून त्यास योग्य वाटेल इतक्या कालावधीसाठी उक्त कालावधी आणखी पुढे वाढविता येईल. तथापि, वाढीव कालावधी दोन वर्षांपेक्षा अधिक असणार नाही.

(३) आयुक्तास, कोणत्याही वेळी किंवा वेळोवेळी अशा कोणत्याही नोटिशीमध्ये सुधारणा करता येईल किंवा ती रद्द करता येईल आणि अशा प्रकारे पूर्वोक्त सुधारणा केलेली नोटीस पोट-नियम (२) अन्वये विहित केलेल्या कालमर्यादेच्या प्रयोजनासाठी नवीन नोटीस असल्याचे समजले जाणार नाही.

(४) या नियमांखालील अधिकारांचा वापर, आयुक्तांकडून किंवा आयुक्ताच्या पूर्व परवानगीने महानगरपालिका उपायुक्ताच्या दर्जापेक्षा कमी दर्जा नसलेल्या कोणत्याही अधिकाऱ्याकडून करण्यात येईल.

४४. **स्थानिक संस्था कराच्या अतिरिक्त प्रदानाचा परतावा.**—नियम ४० च्या तरतुदींना अधीन राहून, आयुक्त, व्यापाऱ्याला किंवा व्यक्तीला स्थानिक संस्था कर, शास्ती किंवा व्याज कोणतेही असल्यास, त्याबाबतीत त्या व्यापाऱ्याकडून भरलेल्या गेलेल्या अतिरिक्त रकमेचा परतावा नमुना ड मधील आदेशाद्वारे करील. हा परतावा एकतर रोख प्रदानाद्वारे किंवा व्यापारी किंवा व्यक्तीने दिलेल्या विकल्पानुसार अशी अतिरिक्त रक्कम, अन्य कोणत्याही कालावधीच्या बाबतीत देय असलेला स्थानिक संस्था कर, शास्ती किंवा व्याज या रकमांमधून वजा करून देता येईल :

परंतु, आयुक्त, अशा व्यापाऱ्याकडून किंवा एखाद्या व्यक्तिकडून देय असलेली कोणत्याही स्थानिक संस्था कराची, शास्तीची किंवा व्याजाची रक्कम, जी भरावयाची राहून गेली तो रक्कम वसूल करण्याबाबत अशी अतिरिक्त रक्कम प्रथमतः लागू करील आणि मग उर्वरित रकमेचा, कोणतीही असल्यास, परतावा करील.

४५. **विवक्षित प्रकरणामध्ये परतावा रोखून ठेवण्याचा अधिकार.**—परतावा देणारा आदेश हा अपिलाचा विषय असेल तर, किंवा या नियमान्वये अन्य कोणतीही कार्यवाही प्रलंबित असेल तर आणि असा परतावा मंजूर करणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्याच्या मते, अशा प्रकारे परतावा मंजूर केल्याने महसुलावर प्रतिकूल परिणाम होणार असेल तर, अशा प्राधिकाऱ्यास, आयुक्ताच्या पूर्व परवानगीने, आयुक्त निर्धारित करील अशा काळापर्यंत परतावा रोखून ठेवता येईल.

४६. **स्थानिक संस्था कराऐवजी आपसमेळ रक्कम प्रदान करणे.**—आयुक्तास अशा परिस्थितीत व त्याने निर्धारित केलेल्या अशा शर्तीस अधीन राहून, कोणत्याही कालावधीच्या संबंधात, या नियमांच्या तरतुदींअन्वये, कोणत्याही व्यापाऱ्याला किंवा एखाद्या व्यक्तीला, त्याला देय असलेल्या स्थानिक संस्था कराऐवजी, कलम १५२ ड नुसार आपसमेळाने निर्धारित केलेली ठोक रक्कम भरण्याची परवानगी देता येईल.

४७. **कागदपत्रे इत्यादी सादर करण्यासाठी नोटीस.**—कलम १५२ त खाली कोणतेही लेख व कागदपत्रे सादर करण्यास कोणतीही माहिती पुरविण्यास, आयुक्त कोणत्याही व्यापाऱ्यास किंवा कोणत्याही व्यक्तीस भाग पाडील तेव्हा तो नमुना "छ" मध्ये एक नोटीस काढील.

४८. **विवक्षित प्रकरणी शास्ती लादणे व व्याज आकारणे.**—(१) कलम १५२ छ मध्ये उल्लेखिलेल्या विक्रीदार व्यापाऱ्याने, आवश्यक असल्याप्रमाणे खरेदीदार व्यापाऱ्यास बील, बीजक किंवा रोखीचे टिपण देण्यात कसूर केली तर, आयुक्त, विक्रीदार व्यापाऱ्यास आपले म्हणणे मांडण्याची वाजवी संधी दिल्यानंतर, जर विकलेला माल हा, विक्रीदार व्यापाऱ्याने उपभोग, उपयोग यासाठी किंवा विक्री करण्यासाठी शहरात आयात केला असता तर त्यावर जो स्थानिक संस्था कर प्रदेय झाला असता त्या स्थानिक संस्था कराच्या रकमेहून अधिक नसेल अशी रक्कम शास्ती म्हणून लादू शकेल.

(२) जर, या अधिनियमाच्या आणि नियमाच्या कोणत्याही तरतुदीअन्वये व्यापाऱ्याकडून किंवा व्यक्तीकडून येणे असलेल्या रकमेचे निर्धारण किंवा पुनर्निर्धारण करताना किंवा कोणत्याही अपिलावर किंवा पुनरीक्षण किंवा दुरुस्ती कार्यवाहीवर कोणताही आदेश देताना, अशा व्यापाऱ्याने किंवा यथास्थिती व्यक्तीने,—

(क) आवश्यक असल्याप्रमाणे, नोंदणीकरिता अर्ज करण्यात कसूर केली असून या अधिनियमाच्या व नियमाच्या तरतुदींचे उल्लंघन करून धंद्याची नोंदणी न करताच व्यापारी म्हणून धंदा चालविला असल्याचे,

(ख) लेखा पुस्तके व कागदपत्रे यांचे निर्धारण व पुनर्निर्धारण, ती सादर करणे व त्यांची तपासणी आणि जागेची झडती घेणे व पुनरीक्षण याबाबतीत कार्यवाहीच्या संबंधातील कोणत्याही नोटिशीचे पालन करण्यात कसूर केली असल्याचे,

(ग) ज्यावर स्थानिक संस्था कर बसवण्याजोगा आहे असा कोणताही माल, उपभोग, उपयोग यांसाठी शहरात विक्री करण्यासाठी आणला गेला असल्याची गोष्ट उघड करण्यात कसूर केल्याचे किंवा विवरणपत्रात स्थानिक संस्था कर देण्याचे समुचित दायित्व दर्शविण्यात कसूर केल्याचे किंवा त्याने चुकीच्या, बनावटीची, परताव्याची मागणी, केली असल्याचे, किंवा स्थानिक संस्था कराची योग्य व बिनचूक रक्कम ठरविण्यासाठी आवश्यक असलेल्या सर्व महत्त्वाच्या बाबी पूर्णपणे व सत्यपणे उघड करण्यात कसूर केली असल्याचे आयुक्ताच्या निदर्शनास आल्यास, आयुक्त, व्यापाऱ्यास किंवा व्यक्तीस आपले म्हणणे मांडण्याची वाजवी संधी दिल्यानंतर, लेखी आदेशाद्वारे व्यापाऱ्यावर किंवा व्यक्तीवर निर्धारित करण्यात आलेल्या किंवा पुनर्निर्धारित करण्यात आलेल्या किंवा अपिलात किंवा पुनरीक्षण किंवा दुरुस्ती यथास्थिती प्रदेय असल्याचे आढळून आलेल्या कोणत्याही स्थानिक संस्था कराची रकमेशिवाय आणखी पुढीलप्रमाणे शास्ती लादू शकेल :—

(एक) खंड (क) खाली समाविष्ट असलेल्या प्रकरणी, अधिनियम व नियम यांच्या तरतुदींचे उल्लंघन करून नोंदणी न करता व्यापाऱ्याने ज्या कालावधीत धंदा चालविला असेल त्या कालावधीकरिता व्यापाऱ्याकडून प्रदेय असलेल्या स्थानिक संस्था कराच्या रकमेच्या दहा पटींहून अधिक नसेल अशी रक्कम.

(दोन) खंड (ख) खाली समाविष्ट असलेल्या प्रकरणी रुपये १०,००० पेक्षा अधिक नसेल अशी रक्कम

(तीन) खंड (ग) खाली समाविष्ट असलेल्या प्रकरणी, उक्त खंडाखाली प्रदेय असल्याचे दिसून आलेल्या रकमेच्या पाच पटींहून अधिक नसेल अशी रक्कम.

(३) (क) एखाद्या व्यापाऱ्याने किंवा व्यक्तीने या नियमांच्या तरतुदीअन्वये किंवा त्याखाली आवश्यक असलेल्या मुदतीत स्थानिक संस्था कर भरला नाही तर, त्याचेकडून येणे असलेल्या स्थानिक संस्था कराच्या वसुलीसाठी, या अधिनियमाच्या किंवा नियमांच्या अन्य तरतुदींसाठी केलेल्या किंवा करावयाचे योजिलेल्या कोणत्याही कार्यवाहीस बाधा न आणता तो सरळ व्याजाच्या रूपाने, अशा स्थानिक संस्था कराच्या रकमेशिवाय आणखी पुढील रकमेइतकी रक्कम देण्यास पात्र असेल :—

(एक) त्याने ज्या दिनांकास असा स्थानिक संस्था कर द्यावयास पाहिजे होता त्या शेवटच्या दिनांकानंतरच्या पहिल्या बारा महिन्यांकरिता अशा स्थानिक संस्था कराच्या दरमहा दोन टक्के, आणि

(दोन) व्यापाऱ्याने किंवा व्यक्तीने स्थानिक संस्था कर देण्यामध्ये कसूर करणे चालू ठेवले असेल अशा मुदतीत किंवा त्यानंतर प्रत्येक महिन्यास अशा स्थानिक संस्था कराच्या दरमहा तीन टक्के,

(ख) एखाद्या व्यापाऱ्याच्या किंवा व्यक्तीच्या बाबतीत या अधिनियमाच्या व नियमाच्या तरतुदीखाली पारित केलेल्या निर्धारण आदेशाच्या परिणामी कोणत्याही कालावधीच्या बाबतीत व्यापाऱ्याकडून किंवा व्यक्तीकडून खंड (ख) खाली ज्याच्या बाबतीत व्याज बसवण्याजोगे असेल अशी स्थानिक संस्था कराहून अन्य कोणताही स्थानिक संस्था कर येणे असल्याचे आढळून आल्यास, असा व्यापारी किंवा व्यक्ती ज्या कालावधीसाठी अशा व्यापाऱ्यावर किंवा व्यक्तीवर कर आकारणी करण्यात आलेली असेल अशा कालावधीच्या समाप्तीनंतरच्या पहिल्या तारखेपासून कर आकारणीच्या अशा आदेशाच्या तारखेपर्यंत प्रत्येक महिन्यास अशा स्थानिक संस्था कराच्या रकमेच्या २ टक्के इतकी रक्कम सरळ व्याजाच्या स्वरूपात देण्यास पात्र असेल. परंतु, या पोट नियमान्वये अशाप्रकारे प्रदेय असलेल्या व्याजाची एकूण रक्कम, या पोट-नियमान्वये ज्यावर व्याज आकारण्यात येते त्या स्थानिक संस्था कराच्या एकूण रकमेपेक्षा अधिक असणार नाही.

स्पष्टीकरण.—या पोट-नियमाच्या प्रयोजनार्थ, महिन्याचा भाग हा एक संपूर्ण महिना असल्याचे धरण्यात येईल.

(४) जेथे कोणताही व्यापारी, उपभोग, उपयोग यांसाठी किंवा शहरात विक्री करण्यासाठी आयात केलेला कोणताही माल ज्यामुळे स्थानिक संस्था कर देण्यासाठी पात्र ठरत नाही किंवा कमी दराने स्थानिक संस्था कर देण्यासाठी पात्र ठरतो अशी खोटी बिले, रोखीचे टिपण, प्रमाणक, उद्घोषणा प्रमाणपत्र किंवा इतर कोणताही दस्तऐवज जाणीवपूर्वक देईल किंवा सादर करील त्याबाबतीत आयुक्त, व्यापाऱ्यास किंवा व्यक्तीस आपले म्हणणे मांडण्याची वाजवी संधी दिल्यानंतर प्रदेय असलेल्या कोणत्याही स्थानिक संस्था कराशिवाय आणखी पुढीलप्रमाणे शास्ती लादू शकेल :—

(क) उपरोक्त दस्तऐवज देण्याच्या किंवा सादर करण्याच्या पहिल्या प्रसंगी, अशा मालाच्या बाबतीत येणे असलेल्या स्थानिक संस्था कराच्या रकमेच्या दुपटीपेक्षा अधिक नसेल अशी शास्ती म्हणून असलेली रक्कम, आणि

(ख) दुसऱ्या किंवा त्यानंतरच्या कोणत्याही प्रसंगी, अशा मालाच्या बाबतीत, देय असलेल्या स्थानिक संस्था कराच्या रकमेच्या पाच पटीहून अधिक नसेल अशी शास्ती म्हणून असलेली रक्कम.

(५) अधिनियम व नियम यांच्या तरतुदींअन्वये व्यापाऱ्याने किंवा व्यक्तीने, शहरात उपभोग, उपयोग किंवा विक्री यासाठी आयात करण्यात आलेल्या कोणत्याही मालावर ज्यामुळे कोणताही स्थानिक संस्था कर आकारणीयोग्य नसेल किंवा कमी दराने आकारणीयोग्य असेल असे प्रतिज्ञापत्र किंवा प्रमाणपत्र सादर केले असेल त्या बाबतीत आणि अशा व्यापाऱ्याला किंवा व्यक्तीला, असे प्रतिज्ञापत्र किंवा प्रमाणपत्र खोटे असल्याचे माहिती असेल किंवा तिला ते खोटे असल्याचे मानण्यास कारण असेल त्याबाबतीत किंवा असा व्यापारी किंवा व्यक्ती यांना असे प्रतिज्ञापत्र किंवा प्रमाणपत्र याचे पालन केले नसेल किंवा त्याचा भंग केला असेल त्या बाबतीत आयुक्ताला, असा व्यापारी किंवा व्यक्ती यांना, त्यांचे म्हणणे ऐकून घेण्याची वाजवी संधी दिल्यानंतर, असे प्रतिज्ञापत्र सादर करण्यात आले नसते तर अशा मालावर, आयुक्ताच्या मते, जो स्थानिक संस्था कर आकारणीयोग्य ठरला असता त्याच्या पाचपट रकमेपेक्षा अधिक नसेल एवढी रक्कम शास्ती म्हणून भरण्याचा निदेश देता येईल.

(६) व्यापारी किंवा व्यक्ती यांनी पुरेशा कारणाशिवाय, कोणत्याही कालावधीचे विवरण विहित कालावधीत भरण्यात कसूर केली असेल तर, आयुक्ताला असा व्यापारी किंवा व्यक्ती यांच्यावर त्यांना त्यांचे म्हणणे ऐकून घेण्याची वाजवी संधी दिल्यानंतर पाच हजार रुपयांपेक्षा अधिक नसेल एवढी रक्कम शास्ती म्हणून लादता येईल. अशा शास्तीमुळे पोट-कलम (२) च्या खंड (ग) अन्वये आकारणीयोग्य असलेल्या कोणत्याही शास्तीला बाधा पोचणार नाही :

परंतु, हा पोट-नियम, आयुक्त, वेळोवेळी आदेशाद्वारे विनिर्दिष्ट करील अशा व्यापारी किंवा व्यक्ती यांच्या वर्गाला किंवा वर्गांना लागू होणार नाही.

(७) कोणताही व्यापारी किंवा व्यक्ती यांनी कलम १५२ छ च्या तरतुदीचा भंग केला तर, आयुक्तास, व्यापाऱ्याला त्याचे म्हणणे ऐकून घेण्याची वाजवी संधी दिल्यानंतर, ज्या व्यवहाराच्या बाबतीत असा भंग करण्यात आला असेल, त्या व्यवहाराच्या संबंधात जे देयक किंवा रोखीचे टिपण देण्यात आले असेल त्या देयकाच्या किंवा रोखीच्या टिपणाच्या रकमेच्या दुप्पट रकमेपेक्षा अधिक नसेल एवढी रक्कम किंवा शंभर रुपये यांपैकी अधिक असलेली रक्कम शास्ती म्हणून भरण्याचा निदेश देता येईल.

(८) कोणतीही व्यक्ती, अधिनियमाच्या किंवा या नियमांच्या तरतुदींअन्वये स्थानिक संस्था कर भरण्यास पात्र असणारा व्यापारी असेल किंवा आयुक्ताने नोटीस बजावून तिला स्थानिक संस्था कर भरण्यास फर्माविले असेल आणि (तिने) विहित पद्धतीत लेखा ठेवण्यात कसूर केली असेल किंवा कोणताही लेखा अथवा अभिलेख ठेवण्याबाबत निदेश देण्यात आला असता असे करण्यास कसूर केली असेल तर, ती जो कोणताही स्थानिक संस्था कर भरण्यास पात्र ठरली असती त्याव्यतिरिक्त आणखी, पाच हजार रुपयांपेक्षा अधिक नसेल एवढी रक्कम किंवा असे उल्लंघन करण्यात आले नसते तर स्थानिक संस्था कराची जी रक्कम देय झाली असती त्या रकमेच्या दुप्पट रक्कम यांपैकी कमी असेल ती रक्कम शास्ती म्हणून भरण्यास पात्र असेल.

**४९. विवक्षित तरतुदींचे उल्लंघन केल्याबद्दल शास्ती लादणे.**—(१) कोणतीही व्यक्ती, स्थानिक संस्था कर म्हणून अधिनियमाच्या तरतुदींअन्वये तिच्याकडून देय असलेल्या स्थानिक संस्था कराव्यतिरिक्त अधिक रक्कम वसूल करील किंवा अनुसूची 'ग' मध्ये विनिर्दिष्ट केलेल्या मालासंदर्भात स्थानिक संस्था कर वसूल करील, तर, ती, जो कोणताही स्थानिक संस्था कर भरण्यास पात्र असेल त्याव्यतिरिक्त पुढीलप्रमाणे शास्ती म्हणून आणखी रक्कम भरण्यास पात्र असेल :—

(एक) वरील पोट-नियम (१) मध्ये निर्देश केलेल्या आदेशाचे उल्लंघन करण्यात आले असेल त्याबाबतीत दोन हजार रुपयांपेक्षा अधिक नसेल एवढी रक्कम किंवा स्थानिक संस्था कर म्हणून वसूल केलेल्या रकमेच्या दुप्पट रक्कम यांपैकी कमी असेल तेवढी रक्कम शास्ती म्हणून भरण्यास पात्र ठरेल आणि त्या व्यतिरिक्त त्या व्यापाऱ्याने किंवा व्यक्तीने वरील पोट-नियम (१) चे उल्लंघन करून वसूल केलेली कोणतीही रक्कम महानगरपालिकेकडे समपहृत करण्यात येईल.

(दोन) समपहरणाचा कोणताही आदेश देण्यात आला असेल त्यावेळी आयुक्त तो निश्चित करील असा तपशील देऊन व अशा पद्धतीने संबंधित व्यक्तींच्या माहितीसाठी त्या संबंधात नोटीस प्रसिद्ध करील किंवा प्रसिद्ध करण्याची व्यवस्था करील.

(२) आयुक्ताला, हा अधिनियम किंवा हे नियम यांच्या तरतुदींअन्वये कोणतीही कार्यवाही करताना किंवा अन्यथा कोणतीही व्यक्ती किंवा व्यापारी, पोट-नियम (१) अन्वये कोणत्याही रकमेच्या शास्तीस किंवा समपहरणास किंवा या दोन्ही गोष्टींस पात्र आहे असे मानण्यास कारण असेल तर तो, अशा व्यक्तीवर नमुना ग मध्ये नोटीस बजावील आणि पोट-कलम (१) मध्ये तरतूद केल्यानुसार कोणत्याही रकमेची शास्ती किंवा समपहरण अथवा या दोन्ही गोष्टी तिच्यावर का लादण्यात येऊ नयेत याचे कारण दाखविण्यास फर्मावील.

(३) त्यानंतर आयुक्त चौकशी करील व त्याला योग्य वाटेल असा आदेश काढील.

**५०. आकडेवारी गोळा करण्याचा अधिकार.**—(१) या नियमांची अधिक चांगल्या रीतीने अंमलबजावणी होण्याच्या प्रयोजनासाठी तसे करणे आयुक्तास आवश्यक वाटल्यास, या नियमांशी संबंधित कोणत्याही बाबींच्या संबंधातील आकडेवारी गोळा करावी असा निदेश त्याला देता येईल.

(२) असा निदेश देण्यात आल्यावर, आयुक्त, कोणत्याही स्थानिक वर्तमानपत्रात नोटीस प्रसिद्ध करून किंवा त्याच्या मते व्यापाऱ्यांचे लक्ष नोटीशीकडे ज्याद्वारे उत्तमरित्या वेधले जाईल अशा कोणत्याही अन्यरीतीने गोळा करावयाच्या आकडेवारीच्या संबंधातील कोणत्याही गोष्टीच्या बाबतीत अशा नोटीशीमध्ये नमूद करण्यात येईल अशी माहिती किंवा विवरणपत्रे सादर करण्यास सर्व व्यापाऱ्यांना किंवा व्यापाऱ्यांच्या कोणत्याही वर्गाला फर्मावील.

ज्या नमुन्यात विवरणपत्रे सादर करावयाची तो नमुना, त्यात कोणता तपशील भरणे आवश्यक आहे आणि किती कालांतराने अशी माहिती किंवा विवरणपत्रे सादर करावयाची या बाबी आयुक्त विनिर्दिष्ट करील त्याप्रमाणे असतील.

५१. **कलम १५२ ह ची पोटकलमे (१) व (२) यांच्या तरतुदी विवक्षित प्रकरणांना लागू न होणे.**—कलम १५२ ह ची पोट-कलमे (१) व (२) यांच्या तरतुदी पुढील प्रकरणांना लागू होणार नाहीत :—

(क) भारतीय दंड संहिता (१८६० चा ४५) किंवा भ्रष्टाचार प्रतिबंध अधिनियम, १९८८ (१९८८ चा ४९) अथवा त्या त्या वेळी अमलात असलेल्या इतर कोणत्याही कायद्यान्वये कोणताही खटला चालविण्यासाठी कोणतेही विवरणपत्र, विवरण, लेखे, दस्तऐवज, पुरावे, प्रतिज्ञालेख व जबानी यांच्या संबंधातील तपशील, किंवा

(ख) कोणतीही नोटीस बजावण्यासाठी किंवा कोणत्याही मागणीच्या वसुलीसाठी या नियमांन्वये कोणत्याही कार्यपद्धतीचा कायदेशीर उपयोग केल्यामुळे असे प्रकटन झाले असेल तेथवर तपशील, किंवा

(ग) कोणत्याही दिवाणी न्यायालयातील ज्या दाव्यात शासन एक पक्षकार असेल अशा कोणत्याही दाव्यात या नियमांन्वये केलेल्या कोणत्याही कार्यवाहीतून उद्भवणाऱ्या कोणत्याही बाबीशी संबंधित असलेला तपशील,— किंवा

(घ) या नियमान्वये वसूलिकरणात आलेल्या स्थानिक संस्था कराच्या जमा रकमा किंवा परतावा त्या रकमा यांची लेखापरीक्षा करण्यासाठी नियुक्त केलेल्या कोणत्याही अधिकाऱ्याकडील तपशील,—किंवा

(ङ) महानगरपालिकेतील अधिकाऱ्यांच्या वर्तणुकीच्या चौकशीशी संबंधित असलेला लोकसेवक (चौकशी) अधिनियम १८६० (१८५० चा ३७) अन्वये आयुक्त म्हणून नियुक्त करण्यात आलेली व्यक्ती किंवा नियुक्त करण्यात आलेल्या व्यक्ती यांच्याशी संबंधित असलेला किंवा अशी चौकशी करण्यासाठी अन्यथा नियुक्त केलेल्या कोणत्याही अधिकाऱ्याशी संबंधित असलेला अथवा भारताच्या संविधानान्वये स्थापन करण्यात आलेला लोकसेवा आयोग अशा चौकशीतून उद्भवणाऱ्या कोणत्याही बाबींशी संबंधित काम पार पाडत असेल तेव्हा त्या आयोगाशी संबंधित असलेला तपशील.— किंवा,

(च) केंद्र सरकार किंवा राज्य शासन यांनी बसवलेला कोणताही कर किंवा शुल्क यांची आकारणी करण्यास किंवा वसुली करण्यास त्याला समर्थ करण्याच्या प्रयोजनासाठी आवश्यक असलेल्या व त्या केंद्र सरकारच्या किंवा राज्य शासनाच्या अधिकाऱ्याकडे असलेल्या वस्तुस्थितीचा तपशील.— किंवा

(छ) अपुरे मुद्रांक लावलेले दस्तऐवज अडकवून ठेवण्यासाठी मुंबई मुद्रांक अधिनियम (१९५८ चा मुंबई ६०) किंवा भारतीय मुद्रांक अधिनियम, १८९९ (१८९९ चा २) अन्वये शासकीय कर्मचारी त्याच्या अधिकाराचा कायदेशीर वापर करीत असताना असे प्रकटन झाले असेल तर असा तपशील,— किंवा

(ज) विधी व्यवसायी, स्थानिक संस्था कर व्यवसायी, सनदी लेखापाल किंवा परिव्यय लेखापाल यांच्याविरुद्धच्या स्थानिक संस्था करविषयक कार्यवाहीच्या संबंधातील गैरवर्तणुकीच्या आरोपाच्या चौकशीशी संबंधित असलेला आणि विधी व्यवसायी, स्थानिक संस्था कर व्यवसायी, सनदी लेखापाल किंवा यथास्थिति, परिव्यय लेखापाल हे व्यवसाय करणाऱ्या व्यक्तींविरुद्ध शिस्तभंगाची कार्यवाही करण्यासंबंधातील अधिकार प्रदान करण्यात आलेल्या अधिकाऱ्याशी संबंधित असलेला असा कोणताही तपशील असेल तेव्हा तो तपशील, किंवा

(झ) संचालक, अर्थ व सांख्यिकी किंवा त्याच्या हाताखालील कोणताही अधिकारी यांच्याकडील अथवा कोणत्याही विक्रेय वस्तूवरील स्थानिक संस्था कर भार निश्चित करण्यास संचालक किंवा अशी व्यक्ती अथवा अशा व्यक्ती यांना समर्थ करण्यासाठी नियम ५० अन्वये प्राधिकृत करण्यात आलेली कोणतीही व्यक्ती किंवा कोणत्याही व्यक्ती यांच्याकडील तपशील, किंवा

(ञ) राज्य शासन कोणत्याही विनिर्दिष्ट प्रकरणी निदेश देईल त्यानुसार त्या त्या वेळी अमलात असलेल्या कोणत्याही कायद्यान्वये चौकशी करण्यासाठी किंवा खटला चालविण्यासाठी केंद्र सरकारच्या किंवा राज्य शासनाच्या अधिकाऱ्याकडे असलेला तपशील.

५२. **नियम ५० अन्वये आवश्यक असलेल्या माहितीचे प्रकटन आणि त्या नियमान्वये माहिती किंवा विवरण सादर करण्यात कसूर करणे.**— (१) नियम ५० च्या प्रयोजनार्थ दिलेल्या कोणत्याही बाबीच्या संदर्भात कोणत्याही वैयक्तिक विवरणे यांची कोणतीही माहिती आणि कोणत्याही वैयक्तिक विवरणाचा कोणताही भाग, मालकाची किंवा त्या वेळेपुरत्या त्याच्या प्राधिकृत एजंटची लेखी पूर्वानुमती घेतल्यावाचून कोणत्याही तपशिलावरून विशिष्ट व्यापाऱ्याला निर्देश ओळखणे शक्य होईल अशाप्रकारे प्रसिद्ध करता येणार नाही आणि या नियमांच्या तरतुदीन्वये कोणत्याही कार्यवाहीच्या प्रयोजनार्थ अशा कोणत्याही माहितीचा वापर करता येणार नाही.

(२) या अधिनियमाच्या किंवा भारतीय दंड संहितेखालील (१८६० चा ४५) खटल्यांच्या प्रयोजनार्थ असेल त्या व्यतिरिक्त नियम ५० अन्वये आकडेवारी गोळा करण्याच्या कामावर नसलेल्या किंवा अधिनियमाप्रमाणे कामकाज चालविण्याच्या कामात गुंतलेल्या नसलेल्या कोणत्याही व्यक्तीला त्या नियमात निर्दिष्ट केलेली कोणतीही माहिती किंवा कोणतेही वैयक्तिक विवरणपत्र पाहण्याची किंवा पहावयास मिळण्याची परवानगी देता येणार नाही.

(३) नियम ५० अन्वये कोणतीही माहिती किंवा विवरण सादर करण्यास फर्मावण्यात आलेली कोणतीही व्यक्ती,—

(क) त्या नियमान्वये आवश्यक असलेली अशी माहिती किंवा विवरणपत्र सादर करण्यास बुद्धीपुरस्सर नकार देईल किंवा कायदेशीर कारण नसताना हयगय करील, किंवा

(ख) जी खोटी असल्याचे तिला माहिती असेल अशी कोणतीही माहिती किंवा विवरण यांना जाणूनबुजून सादर करील किंवा करण्याची व्यवस्था करील तर, आयुक्त, त्या व्यक्तीला आपले म्हणणे मांडण्याची वाजवी संधी दिल्यानंतर, लेखी आदेशाद्वारे त्या व्यक्तीवर शंभर रुपयापर्यंत असू शकेल इतका दंड

बसवू शकेल. आणि ही कसूर चालू राहणारी असेल तेव्हा ती चालू राहील त्या कालावधीसाठी दर दिवसाला दहा रुपयांपेक्षा अधिक नसेल इतका दंड बसवू शकेल.

(४) नियम ५० अन्वये आकडेवारी गोळा करण्याच्या संबंधात कामावर असलेली कोणतीही व्यक्ती त्या नियमान्वये देण्यात आलेल्या किंवा तयार करण्यात आलेल्या कोणत्याही विवरणपत्रातील कोणतीही माहिती अथवा मजकूर, त्या नियमान्वये असलेली तिची कर्तव्ये पार पाडण्यासाठी किंवा अधिनियम आणि हे नियम याखालील किंवा भारतीय दंड संहिता ( १८६० चा ४५ ) याखालील अपराधाबाबतच्या खटल्याच्या प्रयोजनासाठी म्हणून असेल त्या व्यतिरिक्त अन्यप्रकारे हेतुपुरस्सर उघड करत असल्याचे आढळून येईल तर आयुक्त, त्या व्यक्तीला आपले म्हणणे मांडण्याची वाजवी संधी दिल्यानंतर, लेखी आदेशाद्वारे, त्या व्यक्तीवर एक हजार रुपयांपर्यंत असू शकेल इतका दंड बसवू शकेल.

**५३. व्यापारी आणि इतर व्यक्ती यांच्या संबंधीची माहिती लोकहिताच्या दृष्टीने प्रसिद्ध व उघड करणे.**—(१) नियम ५२ मध्ये काहीही अंतर्भूत केलेले असले तरी, कोणत्याही व्यापाऱ्यांची अथवा इतर व्यक्तींची नावे आणि अशा व्यापाऱ्यांच्या व इतर व्यक्तींच्या संबंधात या नियमाखाली केलेल्या कोणत्याही कार्यवाहीशी संबंधित इतर कोणताही तपशील प्रसिद्ध करणे किंवा उघड करणे लोकहिताच्या दृष्टीने आवश्यक किंवा इष्ट आहे असे आयुक्तांचे मत असेल तर त्याला अशी नावे आणि तपशील त्याला योग्य वाटेल अशा रितीने प्रसिद्ध किंवा उघड करता येईल किंवा प्रसिद्ध किंवा उघड करण्याची व्यवस्था करता येईल.

**स्पष्टीकरण.**—भागीदारी संस्था, कंपनी किंवा व्यक्तींचा इतर संघ यांच्याबाबतीत भागीदारी संस्थेचे भागीदार, कंपनीचे संचालक, व्यवस्थापकीय अभिकर्ते (एजंट), सचिव, कोषाध्यक्ष किंवा व्यवस्थापक किंवा यथास्थिती संघाचे सदस्य यांची नावे प्रसिद्ध किंवा उघड करणे हे आयुक्तांच्या मते, प्रकरणाच्या परिस्थितीमुळे समर्थनीय ठरत असेल तर ती नावेदेखील प्रसिद्ध किंवा उघड करता येतील.

(२) समुचित अपील प्राधिकरणाकडे अपील सादर करण्याची मुदत, अपील सादर करण्यात येऊन संपेपर्यंत होईपर्यंत किंवा जर अपील सादर करण्यात आलेले असेल तर ते निकालात काढण्यात येईपर्यंत बसवण्यात आलेला कोणताही स्थानिक संस्था कर किंवा लादण्यात आलेली कोणतीही शास्ती किंवा अधिनियम आणि नियमाविरुद्ध केलेल्या कृतीबाबत कोणत्याही कायदेशीर कार्यवाहीच्या अनुषंगाने झालेल्या शिक्षे संबंधात या नियमान्वये काहीही प्रसिद्ध किंवा उघड करण्यात येणार नाही.

**५४. कार्यवाहीच्या वेळी कोणत्याही प्राधिकरणासमोर हजर राहणे.**—(१) या नियमाखालील कोणत्याही कार्यवाहीच्या संबंधात कोणत्याही प्राधिकरणासमोर उपस्थित होण्याचा हक्क असलेल्या किंवा उपस्थित होणे आवश्यक असलेल्या कोणत्याही व्यक्तीला पुढील व्यक्तीमार्फत हजर राहता येईल,—

(क) नातेवाईक किंवा त्याने नियमितपणे कामावर ठेवलेली व्यक्ती, किंवा

(ख) पोट-नियम (२) द्वारे किंवा त्याअन्वये ज्याला अनर्ह ठरवण्यात आलेले नसेल असा विधि व्यवसायी, सनदी लेखापाल किंवा परिव्यय लेखापाल, किंवा

(ग) आयुक्ताने यासंबंधात वेळोवेळी दिलेल्या सर्वसाधारण आदेशाद्वारे त्याने विनिर्दिष्ट केलेल्या अर्हता ज्याच्याकडे आहेत आणि ज्याच्या नावाची नोंद आयुक्त त्या संबंधात ठेवील अशा नोंदवहीमध्ये केलेली असेल आणि ज्याला पोट-नियम (२) द्वारे किंवा त्या अन्वये अनर्ह ठरविण्यात आलेले नसेल असा स्थानिक संस्था कर व्यवसायी याला अशा व्यक्तीने नमुना "ध" मध्ये प्राधिकारपत्र दिलेले असेल तर असा नातेवाईक, कामावर ठेवलेली व्यक्ती, विधी व्यवसायी, सनदी लेखापाल, परिव्यय लेखापाल किंवा स्थानिक संस्था कर व्यवसायी अशा प्राधिकारपत्रामध्ये अशा कार्यवाहीच्या वेळी अशा व्यक्तीच्या वतीने काम करणाऱ्या प्राधिकाराचा समावेश करता येईल.

**(२) आयुक्त,—**

(क) ज्याला सेवेतून काढून टाकण्यात किंवा बडतर्फ करण्यात आले आहे, किंवा

(ख) जो विधि व्यवसायी, सनदी लेखापाल किंवा परिव्यय लेखापाल असून त्याला, तो ज्या व्यवसायातील आहे त्यामधील व्यक्तींविरुद्ध शिस्तभंगाची कारवाई करण्याचा अधिकार मिळालेल्या प्राधिकरणाने या नियमाखालील कोणत्याही कार्यवाहीच्या संबंधातील गैरवर्तनाबद्दल दोषी ठरवलेले असेल, किंवा

(ग) जो, स्थानिक संस्था कर व्यवसायी असून त्याला आयुक्ताने गैरवर्तनाबद्दल दोषी ठरवले असेल,

अशा कोणत्याही विधी व्यवसायीला, सनदी लेखापालाला, परिव्यय लेखापालाला किंवा स्थानिक संस्था कर व्यवसायीला लेखी आदेशाद्वारे आणि त्या आदेशात नमूद करावयाच्या कारणासाठी व आदेशात नमूद केलेल्या कालावधीमध्ये कोणत्याही प्राधिकरणासमोर उपस्थित राहण्यासाठी अनर्ह ठरवू शकेल.

(३) कोणत्याही व्यक्तीला तिची बाजू मांडण्याची वाजवी संधी दिल्याखेरीज तिच्यासंबंधात अनर्हतेबाबतचा कोणताही आदेश देण्यात येणार नाही.

(४) या नियमान्वये तिच्याविरुद्ध अनर्हतेचा कोणताही आदेश देण्यात आला असेल त्या कोणत्याही व्यक्तीला, तो आदेश रद्द करून घेण्यासाठी असा आदेश तिला कळविण्यात आल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत अर्ज करता येईल.

(५) आयुक्ताचा आदेश, तो देण्यात आल्यापासून एक महिन्यापर्यंत किंवा अर्ज दाखल करण्यात आला असेल तेव्हा अर्जाचा निर्णय होईपर्यंत अंमलात येणार नाही.

(६) आयुक्ताला स्वाधिकारे किंवा या संबंधात त्याच्याकडे अर्ज करण्यात आल्यानंतर कोणत्याही व्यक्तीविरुद्ध पोट-नियम (२) अन्वये देण्यात आलेला कोणताही आदेश रद्द करता येईल आणि त्यानंतर अशी व्यक्ती अनर्ह असण्याचे बंद होईल.

